

नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

डिसेंबर - २०१६

शेती, शेतकरी आणि शासन - लेखांक - ९

श्री शंकराचार्य, श्री ज्ञानेश्वर व लोकमान्य टिळक- भगद्गीतार्थ समन्वय (पूर्वार्ध)

जुने लेखन

पुस्तक परीक्षण - 'धग असतेच आसपास' : सत्त्वसंपन्न कविता

पुस्तक परीक्षण - युगवाणीचे तीन संपादक

पुस्तक परीक्षण - 'स्वातंत्र्यवीर सावरकरांचे रत्नागिरीतील सामाजिक कार्य'



अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ७०। अंक ३ । डिसेंबर २०१६
मार्गशीर्ष/पौष शके १९३८
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.









अनुक्रमणिका

# नवभारत

## डिसेंबर २०१६

## अनुक्रमणिका

# संपादकीय



**कै. वसंतराव पळशीकर**

२९ ऑक्टोबर २०१६ रोजी वयाच्या ८० व्या वर्षी 'नवभारत' मासिकाचे माजी संपादक आणि महाराष्ट्रातील ज्येष्ठ विचारवंत वसंतराव पळशीकर यांचे निधन झाले. एक निरलस, निरभिमानी व सत्त्वशील कार्यकर्ता आणि सत्यनिष्ठ चौरस विचारवंत असा वसंतरावांचा लौकिक होता.

'प्राज्ञपाठशाळा' आणि 'नवभारत' मासिक यांच्याशी १९९५पासून २००४ सालापर्यंत ते निगडित होते. प्राज्ञपाठशाळा मंडळाचे अध्यक्ष कै. मे. पुं. रेगे. यांच्याशी त्यांचे घनिष्ठ संबंध होते. अनेक विषयांवर दोघांचे विचार बहुतेक वेळा परस्परांशी जुळणारे असत. प्रा. रेगे यांच्याविषयी वसंतरावांना वाटणारा जिव्हाळा त्यांनी प्रा. रेगे यांच्या 'विवेकवाद, विज्ञान आणि श्रद्धा' या लेखसंग्रहाचे संपादन करून यथायोग्य पद्धतीने व्यक्त केला. १९९५ साली वसंतराव वाईला आले ते प्रा. रेगे यांच्या कामात त्यांना मदत करण्यासाठी. मला ते म्हणाले होते, "रेगे सर सांगतील ते काम मी करणार आहे" जवळजवळ १० वर्षे 'नवभारता'चे संपादकीय काम वसंतरावांनी अतिशय कष्टपूर्वक व मोठ्या कसोशीने पार पाडले. त्यांची लेखांची मुद्रिते तपासण्याची पद्धती इतकी बारकाव्याची असे की, त्यांनी दुरुस्त केलेले मुद्रित पाहताना मला आश्चर्य व आदर वाटे. लेखांची शेवटची मुद्रिते वसंतराव टंकलेखकाच्या शेजारी बसून करून घेत असत. वसंतरावांच्या या काटेकोरपणामुळे कधीकधी नवभारताचा अंक वेळेवर निघण्यास अडचणही येत असे. तथापि जे काम आपण हाती घेऊ, ते अगदी निर्दोष व परिपूर्ण झाले पाहिजे, याबद्दलची त्यांची चिकाटी थक्क करून टाकत असे.

वसंतरावांनी समाजकार्याचा वसा अगदी तरुणपणीच उचलला. १९५२ साली 'इंटर सायन्स' ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर त्यांना वैद्यकीय शिक्षणासाठी प्रवेश सहज मिळाला असता. परंतु त्यांनी शिक्षण सोडले आणि ते भूदानकार्यात सामील झाले. ओरिसामधील कोरापूट जिल्हात विनोबांना जी जमीन दान मिळाली होती, तिची व्यवस्था लावण्याचे काम विनोबांनी अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांच्याकडे सोपवले होते. तिथे वसंतराव अण्णासाहेबांचे मदतनीस म्हणून काम करू लागले. वसंतरावांशी पुढे जे माझे बोलणे झाले त्यावरून मला असे वाटते की, त्या सर्व कामाविषयी त्यांचा काहीसा भ्रमनिरास झाला असावा.

ओरिसा सोडून वसंतराव महाराष्ट्रात १९५९ साली परत आले व पुण्यात राहून त्यांनी निरनिराळ्या वैचारिक आणि परिवर्तनवादी आंदोलनांत भाग घ्यायला सुरुवात केली. ६० च्या दशकाच्या उत्तरार्धात महाराष्ट्रात तरुणांच्या चळवळींना बरीच उकळी आली होती. सामाजिक सुधारणा, समाजवादी समाजरचना, अंधश्रद्धाविरोधी चळवळ, मुस्लिम सत्यशोधक चळवळ आणि युवक क्रांती दलाची संघटना अशा अनेक हालचालींनी तो काळ गजबजून गेला होता. प्रत्यक्ष चळवळींशी वसंतराव फार घनिष्ठ संबंध ठेवून होते असे नाही; परंतु अशा चळवळींतून जे वैचारिक प्रश्न निर्माण होतात. त्या प्रश्नांवर लेख लिहिणे, चर्चांतून भाग घेणे, सभा-संमेलने आणि चर्चा-शिबिरे यांच्याद्वारे कार्यकर्त्यांची बौद्धिक तयारी करून घेणे यांत त्यांना अधिक रस वाटे.

१९७० सालानंतर अशा त-हेची वैचारिक कामे करणा-या बुद्धिवंतांची एक फळीच महाराष्ट्रात तयार झाली होती.

अनुक्रमणिका

प्रा. अ. भि. शहा, प्रा. मे. पुं. रेगे, प्रा. गोवर्धनदास पारीख, श्रीयुत प्रभाकर पाध्ये ही त्यांतील काही ठळक नावे. पुण्यात प्रा. गं. बा. सरदार यांच्या चाहत्यांचाही एक गट होता. त्यांनी 'समाजप्रबोधन पत्रिका' नावाचे मासिक सुरू केले होते. वसंतराव त्या द्वैमासिकाचे सुरुवातीपासून संपादक होते. प्रा. राम बापट, प्रा. भणगे, प्रा. सीताराम रायकर अशा सहाय्यकांसोबत वसंतरावांनी हे काम अडीच वर्षे सांभाळले आणि 'पत्रिके'ला लौकिक मिळवून दिला. ह्याच काळात मी वसंतरावांना पहिल्यांदा भेटलो, असे मला आठवते. त्या सुमारास वसंतराव, राम बापट अशी मंडळी दर रविवारी सकाळी (मला वाटते, साधना कार्यालयात) विचार-बैठक घेत असत. तिला मी जात असे. तेथे बापट आणि वसंतराव यांच्यात घडणा-या चकमकींची आठवण मला मधूनमधून येते.

वसंतराव त्यांच्या घडणीच्या काळात गांधीवादी कार्यकर्त्यांच्या सान्निध्यात वावरले असले, तरी अनेक गांधीवादी कार्यकर्त्यांत असणारा सुतकी सोवळेपणा त्यांच्या ठिकाणी नव्हता. चांगले चटकदार खावे, जमल्यास उत्तम पेयाचा आस्वाद घ्यावा, खट्याळ विनोद करून खदाखदा हसावे, शेजारी बसलेल्या मनुष्याला कोपरखळ्या द्याव्यात अशा त-हेचा त्यांच्या स्वभाव होता. वाईला प्राज्ञपाठशाळेने भरविलेल्या चर्चासत्रांना अतिशय नेटके आणि नियमबद्ध आणि तरीही मोकळे स्वरूप होते. या चर्चासत्रांचे किंवा शिबिरांचे संचालन करण्याची पाळी कायमच वसंतराव येत असे. वसंतरावांची मते बहुतेक वेळा ठाम असत. परंतु विरोधी मतही सर्व तपशिलासकट मांडू देण्यास ते कायम वाव देत. इतकेच नव्हे, तर विरोधकाने एखादा मुद्दा आपल्या विवेचनातून चुकून गाळून टाकला असला, तर तोही ते स्वतःचा असल्याप्रमाणे तितक्याच समर्थपणे मांडत असत. इतके झाल्यावर पुनः आपले म्हणणे ते सविस्तरपणे व दुस-याच्या गळी उतरेल इतक्या रेखीवपणे सांगून समारोप करीत. ही चर्चासत्रे म्हणजे विविध मुद्द्यांची एक चटकदार व चमचमीत मेजवानी असे. प्रा. रा. भा. पाटणकर यांनी 'अपूर्ण क्रांती' हे पुस्तक लिहिले होते. त्या पुस्तकावर दोन दिवसांचे व सुमारे २० अभ्यासक सामील झालेले उत्तम चर्चासत्र प्रा. रेगे व वसंतराव यांनी घडवलेले होते. पुढे 'फाळणी' या विषयावर बांग्लादेशातील एका मुसलमान प्राध्यापकाचे विचार व त्यावर चर्चा असाही कार्यक्रम वसंतरावांनी घडवून आणला होता.

वसंतराव पळशीकर यांचे असे आंतरिक प्रतिपादन असे की, जे कार्यकर्ते आणि विचारवंत आहेत, त्यांच्या योगक्षेमाची जबाबदारी समाजाने उचलली पाहिजे. त्याला मोठ्या ऐषरामाचे नव्हे, पण सुखाचे आणि निश्चिंत जीवन जगता आले पाहिजे. सुदैवाने वसंतरावांना अनेक पुरस्कार मिळाले. तसेच त्यांच्या सुविद्य पत्नी वेणूताई यांच्या नोकरीचाही आधार होता. त्यामुळे वसंतराव आपले कार्य निष्ठेने व कुणाचेही ओशाळे न राहता करू शकले. अर्थात वसंतराव कुणाच्या अधीन राहतील, अशी कल्पनाही करवत नाही.

१० वर्षापूर्वी वसंतरावांना मस्तिष्कघाताचा आजार झाला व त्याचा परिणाम म्हणून पक्षाघात जडला. त्यांचे बोलणे इतके अस्पष्ट झाले की, वेणूताईंच्या मध्यस्थीनेच ते कळू शके. अशा स्थितीत त्यांना पाहणे आणि त्यांच्याशी बोलणे ही दुःखदायक गोष्ट होती. वसंतराव त्यातून सावरत होते. ते प्रवास करू लागले होते. नाशिक, पुणे, वाई अशा ठिकाणी ते मोटारीतून जात असत. त्यांचा अभ्यास, चिंतन, चर्चा हे कार्यक्रमही या सगळ्या मर्यादा सांभाळून होत असत.

वसंतराव आता गेले. त्यांच्यासारखा निर्मळ मनाचा, सलगी देणारा, खेळीमेळीने आणि बरोबरीच्या नात्याने सर्वांना सांभाळून घेणारा, अतिशय अवघड आणि गुंतागुंतीच्या विषयातील सर्व बारीकसारीक युक्तिवादांची चपखल मांडणी करणारा आणि याहून विशेष म्हणजे कायम चांगलेच होईल, आपण करीत असलेले काम आज ना उद्या या नाना अडचणींनी व रोगिष्ट विचारांनी पछाडलेल्या मराठी समाजाला मांगल्याचा स्पर्श घडवून आणील, अशी श्रद्धा व ध्येयवाद बाळगणारा माणूस पुनः लवकर भेटेल, ही शक्यता फारच कमी आहे.

कै. वसंतराव पळशीकर यांना 'नवभारत' मासिकातर्फे आणि प्राज्ञपाठशाळामंडळातर्फे भावपूर्ण श्रद्धांजली. त्यांच्या कुटुंबीयांच्या दुःखात आम्ही सहभागी आहोत; खरेतर ते आमच्या प्राज्ञपाठशाळामंडळाच्या कुटुंबाचेच एक आदरणीय घटक होते.

श्री. मा. भावे

# शेती, शेतकरी आणि शासन

लेखांक - ९

श्री. के. वनपाल

१९७५ च्या त्या ज्वारीच्या खरेदी-विक्रीच्या दिव्यातून बाहेर पडलो. शासनाच्या पुरवठा विभागात हळबे म्हणून एक अतिशय संवेदनशील सेक्रेटरी होते. त्यांनीच अंडरसेक्रेटरींच्या अहवालावरून आमच्या जिल्ह्याला दोषमुक्त ठरवलं होतं. त्यांनी एकदा इच्छा व्यक्त केली की, “आईला पंढरपुरात काही दिवस राहून दररोज विठ्ठलाचं दर्शन घ्यायचं आहे. कसं करता येईल?”

“त्यात काय? केव्हाही पाठवून द्या सोलापूरला. इथून पंढरपुरला नेऊन त्यांची इच्छा पूरी करून टाकू.” – मी.

त्यांनी आठवड्याभरात तशी योजना करून त्यांच्या आईला सोलापूरला पाठवलं. मी त्यांची बडव्यांच्या एका कुटुंबात व्यवस्था लावून दिली. त्यात पुन्हा माझी बदली सांगलीला भूमिसंपादन अधिकारी म्हणून झाली. फक्त एकच वर्ष मी पुरवठा खात्यात अधिकारी होतो. ज्वारी-प्रकरणात उत्कृष्ट काम झाल्यामूळे बदली होण्याची खरेतर शक्यता नव्हती. पण अॅड्जस्टमेंट नावाचे कारण असतं. त्याला अनुसरून ही बदली झाली होती.

हळबेसरांनी मला बोलावून घेऊन ‘बदली रद्द करून घेऊ का?’ म्हणून विचारलं; पण बदली रद्द करण्यासाठी खटपट करणं माझ्या पठडीत बसणारं नव्हतं. एक म्हणजे, ही खटपट वरिष्ठांच्या नजरेत येते आणि बदली करणा-या अधिका-यांचा राग होतो. दुसरं असं की, मला वाटे, जाऊ दुस-या गावी. नवी माणसं पाहायला मिळतील! नवा अनुभव येईल व पद कोणतंही असलं तरी त्याचं एवढं वाटून घ्यायचं कारण नाही. (भूमिसंपादन अधिकारी म्हणजे सायडिंगला टाकलेली पोस्ट! पण मी ते मनाला लावून घेतलं नाही.)

सांगलीला रुजू झालो. कॅप्टन अशोक देशपांडे तिथे पुरवठा अधिकारी होते. त्यांच्या खटपटीमुळे मला आगगाडीच्या डब्यासारखी लांबुळकी, तीन खोल्यांची जागा मिळाली.

सांगलीत वसंतदादांच्या नावाची ‘वसंत कॉलनी’ म्हणून सांगली-मिरज रस्त्यावर वस्ती आहे. तेथे तीन खोल्यांच्या जागेत माझं ऑफिस. हाताखाली स्टाफ म्हणून एक अव्वल कारकून, एक शिपाई, एक सर्कल इन्स्पेक्टर आणि एक कारकून. भूमिसंपादन अधिकारी हा भूमि-संपादन कायद्यानुसार तेवढ्या कायद्यापुरता कलेक्टरच्या जोडीचा अधिकारी. त्याच्या निर्णयावर महसूल खात्यात अपील करता येत नाही. एकदम हायकोर्टातच रिट पिटीशन करावी लागते. मात्र भूमिसंपादनाचं कामं जरा जिकिरीचं असतं. ज्याची जमीन संपादन करायची त्याला आधी कलम ४ खाली नोटीस बजावायची. नंतर कलम ५ खाली चौकशी करायची. पुन्हा कलम ६ खाली नोटीस पाठवायची. साधारण ५२ आठवड्यांत निकाल लावून जमिनीचा मोबदला द्यायचा. मोबदला खातेदारास मान्य नसल्यास त्याने कोर्टात दाद मागून मोबदला वाढवून घेण्याची याचना करायची, असे हे काम. थोडे धिमे. त्यामूळे उसंत बरीच मिळे.

जमिनीचे वाद कोर्टात लवकर मिटत नाहीत. तसे आयुष्यातही पाठ सोडत नाहीत. याचा एक भयंकर अनुभव आला तो असा.

मागेच सांगितले आहे की, कुळाकडून जमीन ताब्यात घेण्यासाठी मी १९५७ साली किरोलीला जाऊन बरीच खटपट केली. कुळाचा आणि आमचा वाद चालू असताना, गावातला एक तरुण पोरगा आमच्या घरावरून जात असे. त्याला आमचा आणि कुळाचा वाद माहीत होता. त्याचे वडील माझ्या वडिलांचे जवळचे मित्र होते.

एकदा आमच्या घरावरून जाताना त्याने कडी वाजवली आणि “काय काही करतात का, मामलेदार फौजदार? देतायत का जमीन ताब्यात?” असं म्हणून तो पुढे पळून गेला. मी कडी काढून दार उघडलं आणि तो कोणत्या दिशेने गेलाय ते पाहिलं. आमच्या अंगणात एकानं म्हैस बांधली होती तिचं लोढणं उचललं आणि

अनुक्रमणिका

बाहेर जाऊन लपून बसलो तेवढ्यात तो पोरगा त्याच रस्त्यानं परतला. दिसल्याबरोबर मी त्याच्या पाठीत लोढण्याचा रपाटा मारला. तो खाली पडला. आसपासच्या घरातल्या बायका उंब-यावर गप्पा मारत होत्या. त्यांनी भरभरा येऊन आमचं भांडण सोडवलं. मात्र जाता जाता त्या पोरानं मला खूप शिव्या घातल्या आणि आव्हान दिलं, "ये, लेंडूरीला परसाकडेला. दगडानं ठेचून मारतो की नाही बघ, हरामखोर!"

झालं. राग गेला कुणीच्या कुणीकडं आणि मला भीती वाटायला लागली, आता हा काही मला सोडणार नाही. लेंडूरीला जायची वेळ बदलली तरी रहिमतपूरला नोकरीसाठी जावं लागणारच आणि ती वाट देवळापुढनं. म्हणजे याने पाळत ठेवली तर तो निश्‍चित बदला घेणार! वडिलांची एक गुप्ती होती. म्हणजे काठीसारखी दिसणारं लाकूड पण त्यात छोटीशी तलवार. आणखी एक चाकू. त्याला पाच पाती. एकीकडे तीन आणि दुसरीकडे दोन अशी उघडणारी. हा चाकू आता कायम खिशात ठेवायचा आणि येईल त्या प्रसंगाला तोंड द्यायचं, असं ठरवलं. पण तेव्हातरी प्रसंग काही आला नाही.

(१)

आता ७६ साल होतं. १९ वर्षे उलटली होती. ह्या काळात आमच्या गावात एक भयंकर प्रकरण घडलं होतं. वर जो पोरगा सांगितला, तो आता तरुण झाला होता. आमच्या गावातला एक तरुण मिलिटरीत गेला होता. त्याच्याशी या वर सांगितलेल्या मुलाच्या बहिणीचे प्रेमसंबंध जुळले होते. भावाला आणि घरच्यांना हे प्रकरण माहीत झाल्यावर त्यांनी कडाडून विरोध केला होता. भाऊतर फारच रागावला होता.

त्याने गावतल्या पाटलाला हाताशी धरलं. पाटलाने सांगितलं तर बहीण आणि तिचा प्रेमवीर ताळ्यावर येतील, असं त्याला वाटलं. पण पाटील काही बधेनात. पाटलांच बरोबरच होतं. एखाद्याच्या प्रेमप्रकरणाशी पाटलाचा काय संबंध? पण प्रियकरणीचा भाऊ हुशार. त्यानं ठरवलं की, पाटलाला कोरेगावात ते खटल्याच्या तारखेला येतीलं तेव्हा गाठायचं आणि मटण - कोंबडी खायला घालायची. याला पाटलाचा दिनक्रम जाणून घ्यायचा होता.

१९६५ सालच्या आषाढी एकादशीच्या दोन दिवस आधी पाटलांनी गावातल्या बारक-यांना सांगितलं होतं की, देवळासमोर सकाळी जमा. उशीर नको म्हणून पाटील देवळापुढच्या पटांगणातच अंथरूण टाकून झोपले होते. या तरुणाच्या मनात काय आलं काय की? त्यानं रात्री चार तगडी माणसं जमवली आणि त्यांच्या हातात बांबू दिले.

ही सर्व तरुण माणस पाटलांपाशी गेली. पाटील उताणे झोपले होते. एक बांबू छातीवर दुसरा पायावर आडवा टाकून बांबूच्या दोन्ही टोकांशी एक एक अशी चार माणसं बसवली. नंतर त्याने तळपत्या कु-हाडीचे घाव पाटलाच्या गळ्यावर घालून धडापासून मुंडकं वेगळं केलं. त्यावर गोधडी घातली आणि हे सर्व तरुण पळून गेले.

वास्तविक हा राग त्या मुलाने बहिणीवर किंवा तिच्या प्रियकरावर काढला असता तर ते समजण्यासारखं होतं. पण ति-हाईत पाटलाचा खून त्यानं का करावा, याचं गावाला आश्‍चर्य वाटलं. छोट्या गावात गुन्हेगार सहजासहजी सापडतो पोलिसांनी याला दोन-चार दिवसांत जेरबंद केलं. वय लहान असल्यानं याला जन्मठेपेची शिक्षा झाली. तुरुंगातील ब-या वर्तणुकीमुळे त्याची आठ वर्षांनीच सुटका झाली.

ह्याला गावात येऊन राहणं धोक्याचं वाटलं म्हणून तो शेजारच्या गावात राहू लागला. पण मधूनमधून सायकलवरून गावात यायचा. आणखी भयंकर गोष्ट म्हणजे त्याने एक हिटलिस्ट तयार केली होती. त्यात कोणाची नावे आहेत, हे मात्र त्याने जाहीर केले नाही.

हा मनुष्य ११ च्या सुमारास सायकलवरून गावात यायचा. तोपर्यंत गडीमाणसं रानात गेलेली असायची. म्हातारी माणसं देवळात किंवा चावडीसमोरच्या शेडमध्ये गप्पा मारीत असायची. (केव्हाही गावी जा, ठराविक वृद्ध माणसं अशी शेडमध्ये बसून गप्पा मारीत असतात. गप्पा तर अशा झोकाच्या आणि टिंगळ-टवाळकीच्या की, त्यांच्यात बसून त्या ऐकण्यात गंमत येते. त्यामुळे मीही त्यांच्यात बसून हा आनंद घेत असतो.) अशा वेळी हा गुन्हेगार तरुण तिथे यायचा आणि 'आता बघतो एकेकाला' असं म्हणून सायकलवरून घिरट्या मारून

अनुक्रमणिका








निघून जायचा.

याचं लक्षण काही खरं नाही अशी गावात चर्चा व्हायची. आपलं नावतर त्या हिटलिस्टमध्ये नाही ना, याची काळजी वाटायची. पण बोलायचं कुणाशी आणि करायचं काय?

याच काळात त्याचा तुरुंगात झालेला दोस्त सांगली जिल्ह्यातल्या कवठेपिरान या गावी सुटून आला होता. त्याला भेटावं अशी याला इच्छा झाली आणि तो सांगलीला आला. येताना मी सांगलीला कुठे राहतो, कुठे ऑफिस आहे याची चौकशी करून पत्तेबित्ते घेऊन सांगलीला आला. विचारत विचारत तो सकाळी साडे-अकराच्या सुमाराला माझ्या ऑफिसात माझ्या समोरच आला!

पोटात धस्स झाल! हा इकडे कुठे? यानं पाटलांना सोडलं नाही. अगदी कपटानं, कट करून नाहक पाटलांना मारलं. मी तर याच्या पाठीत लोढणा मारला होता. याचा काहीतरी डाव असणार! पण मीही त्याच्याच गावचा. "मी जरा आत जाऊन येतो, बस रे", असं म्हणून आत गेलो. आत शिपाई होता. मोठा धट्टाकट्टा होता. त्याला सांगितलं, "एक काम कर. एक दंडुका पैदा कर आणि खाली जीप आहे त्यात पाठीमागं जाऊन बैस. बाकी काय करायचं ते नंतर सांगतो. हे पटकन झालं पाहिजे." त्यानं तस केलं याची खात्री होईपर्यंत या तरुणाला गप्पात गुंगवलं.

वास्तविक त्याच्या मनात तसलं काही काळंबेरं नसावं, हेही बोलण्याबोलण्यातून माझ्या लक्षात आलं. कारण, लहानपणी माझं पाहिलेलं रूप आणि ऑफिसरचा आत्ताचा दर्जा याचं सगळं त्याला अक्रीत वाटत होतं, हे त्याच्या बोलण्यावरून दिसत होतं. तथापि अतिवेगाने माझे विचार चालू होते. त्याच्या हालचालीवरही माझं लक्ष होतं. न जाणो, पटकन खिशातून एखादा चाकू काढून वार करायचा!

बोलण्याच्या शेवटी त्याचा खरंच तसा काही विचार नाही हे ओळखून मी त्याला जेवणाचा आग्रह केला. तो "नाही, नाही" म्हणू लागला. मग मी जास्तच आग्रह करू लागलो. शेवटी, "निदान मधुबन हॉटेलमध्ये थोडा नाश्ता करून जा," म्हणून मी त्याला हाताला धरून उठवलं. जीपमध्ये समोरच्या सीटवर दोघं बसून पाठीमागं शिपायाला फक्त 'सावध राहा' अशी खूण केली. त्याला मधुबन हॉटेलमध्ये भरपूर खायला घातलं. खूप मनमोकळेपणाने तुरुंगात असतानाच्या गमती त्यानं सांगितल्या. नाश्ता झाल्यावर त्याच जीपनं सांगलीच्या स्टँडवर नेलं आणि तो "नको, नको" म्हणत असताना कवठेपिरानच्या एसटीत त्याला बसवलं आणि मग आफिसकडे जीप फिरवली. हुश्श!!

(२)

मला वाटलं होतं की, हिटलिस्टची कल्पना मागे पडली; निदान मी तरी तिच्यात नाही! बालपणातलं ते भांडण त्याच्या अजिबात लक्षात नाही. सुटून आल्यावर त्यानं हिटलिस्ट केल्याचं जेव्हा कानावर आलं होतं, तेव्हापासून या दिवसापर्यंत ती धास्ती कायम माझ्या काळजात वास करून होती. पण माझ्याकडून परत गेल्यावर हे त्याचं गावात जाऊन दम देण्याचं प्रकरण पुन्हा सुरू झाल्याचं मला कळलं. मग गावातल्या अगदी अट्टल पुढा-यांनी एक योजना आखली. याच्या घरातल्या लोकांनाच थोडं फितवलं, हाताशी धरलं आणि मोठा कट रचला.

हा मनुष्य साधारण ११ च्या सुमाराला येतो. गावाच्या वेशीपर्यंत येताना एक शंभर मीटरचा चढ लागतो. तेव्हा त्याची सायकल हळू चालते. हे सगळं लक्षात घेऊन त्यांनी बेत आखला. वेशीजवळ लक्ष्मीच्या देवळात काही-जणांनी लपून बसायचं. सायकलचा वेग कमी झाला की, लांबनंच फास तयार करून ठेवलेली बैलाच्या कास-याची दोरी त्याच्या गळ्यात टाकायची. हा खाली पडणारच त्याला तसाच ओढत पटकन देवळासमोर आणायचा आणि ठेचून मारायचा! कायमची कीड घालवायची! त्यांनी जागाही निश्चित केली होती. जिथं यानं कु-हाडीनं पाटलाचं मुंडकं धडावेगळं केलं होतं, तीच जागा याला मोक्षासाठी दाखवायची!

एके दिवशी अगदी ठरल्याप्रमाणे या लोकांच्या मनासारखं झालं. तो असाच चढणीवरून हळूहळू सायकल मारत येत होता. एखाद्या सिनेमात शोभावा असाच हा सीन होता. ठरल्याप्रमाणे फास टाकला गेला, याला खाली ओढण्यात आलं आणि फरफटत ठरलेल्या ठिकाणी पोचवलं. मग त्याची निर्घृण हत्या करण्यात

आली.

गावातली सगळी मारेकरी माणसं शेतात पळून गेली. काही तास जाऊ दिले आणि एका भोळसट माणसाला रहिमतपूरच्या पोलिस स्टेशनवर जाऊन वर्दी देण्यासाठी पाठवलं.

पुढं गावच्या संशयित लोकांना पोलिसांनी पकडून नेलं. खटला खूप दिवस चालला. पण एकानेही आपण खून पाहिला अशी साक्ष दिली नाही. संशयितांना थोडा त्रास झाला; पण सगळेजण अगदी निर्दोष सुटले! एक अनाकलनीय पर्व संपले!

या पोराच्या वडिलांना ही केस लढवताना खूप खर्च करावा लागला. गावात सर्वांत श्रीमंत शेतकरी म्हणून त्यांची ख्याती होती. पण जमिनी विकाव्या लागल्या आणि अपमानाची पराकाष्ठा झाली. एखाद्या घरगुती किंवा सामाजिक प्रश्नापायी काय फज्जा उडतो, याचा हा नमुना.

(३)

आता माझ्या कामाला जरा वेग येऊ लागला. चौकशीसाठी नोटिसा बजावलेल्या असायच्या. त्यासाठी कधी शिराळ्याला तर कधी कोथरूडला जायला लागायचं. त्यासाठी इरिगेशन खात्याकडून जीप आणायची. पण ती जीप इस्लामपूरला डेप्युटी इंजिनिअरकडे असायची. कधी मिळायची, कधी नाही. त्यामुळे कामात अडथळा यायचा. तेव्हा मी इरिगेशन खात्याच्या वरिष्ठ अधिका-यांशी भांडून स्वतंत्र जीप मागून घेतली. त्यांनीही ते उदारपणाने मान्य केले.

माझ्या फिरतीत मला दिसून आले की, ब-याच शेतक-यांच्या जमिनी डोंगरी भागात होत्या. डोंगराच्या उताराला काय पिकणार? सात-बा-यावर 'तीसाली कुमरी', 'दससाली कुमरी' असा शेरा असे. म्हणजे ती जमीन तीन साल किंवा दहा साल कुमारी ठेवण्याची प्रथा! म्हणजे तिचा उपयोग उत्पन्नासाठी शून्य म्हणूनच. टाउन प्लॅनिंग ॲक्टमधील तरतुदीनुसार तिची प्रत 'पड' किंवा 'पोट खराब', अशी धरून तिचा मोबदला एकरी २०० रुपये प्रमाणे द्यावा. अशा आशयाच्या सूचना! मला हे बघून आश्चर्याचा धक्काच बसला. त्या काळातही २०० रुपयांत महिन्याचे सामान येत नसे आणि बुटाची किंमतही २०० रु. असे. शेतक-याला मात्र एकरी फक्त २०० रुपये याप्रमाणे जमिनीची किंमत द्यायची? मला आणखीन आढळून आले की, चांदोली गावाच्या नजीकच्या संपादित केलेल्या जमिनीवर मशिनरी ठेवण्यासाठी सरकार शेड, रेस्टहाउस अशी बांधकामे करीत होते. तिथे ठेवायच्या कोच, किंमती क्रोकरी अशा वस्तूंसाठी पैसा खर्च होत असे. मात्र डोंगरकपारीत कष्टानं आयुष्य काढणा-या आदिवासींना एकरामागे फक्त २०० रुपये द्यायचे? माझे मन मला स्वस्थ बसू देईना. मी कमिशनर ससाणे-साहेब यांची भेट मागितली. पुण्याला जाऊन त्यांना आग्रहाची विनंती केली की, चांदोलीप्रकल्पाला भेट द्या.

आठवड्याभरात हे चांदोलीला आले. सरपंचाकडून त्यांना स्वागतपर पान-सुपारी करवली. नंतर त्यांना घेऊन पेटलोंड या अवघड जागी वसलेल्या गावी घेऊन गेलो. वाटेत त्यांना माझी व्यथा सर्व बाजूंनी समजावून सांगितली. "वनपाल, तुमचं सगळं पटतं मला; पण शासनाच्या नियमापुढं आपण काय करू शकणार?"— कमिशनर.

"सर, मी ॲवार्डच्या शेवटच्या पॅ-यात किंमत ठरवण्याविषयी माझं मत जस्टीफिकेशनसह सगळं व्यवस्थित लिहितो. आपल्याकडे ॲवार्ड स्क्रुटिनीसाठी येईल. तेव्हा आपण फक्त माझ्या मताचा स्वीकार करून ते प्रकरण सचिवालयाकडे पाठवायचे. मी सचिवालयात स्वतः जाऊन तिथल्या सेक्रेटरींना माझे मत पटवून देण्याचा प्रयत्न करतो. आपण जिरायती जमिनीस कमीत कमी रुपये २००० एकरी इतका मोबदला देतो. तेवढे-तरी या आदिवासी शेतक-यांना मिळावेत, असा मी शासनाकडे हट्ट धरतो."

कमिशनरसाहेबांना ते पटले. त्यांच्या या फिरतीत त्या शेतक-यांचे दैन्यही त्यांच्या नजरेपुढे आले होते. बहुतेक शेतकरी – नव्हे, आदिवासीच ते – लंगोटी लावलेले असायचे. घरीतर चहासाठी दूधही नसायचं. कंदमुळं आणि फणस यांवर त्याचा निर्वाह चालायचा. सगळं कमिशनरसाहेबांना दाखवलं.

एक–दोन ॲवार्ड्स माझ्या शिफारशीनुसार मंजूर झाल्याने मला आणि शेतक-यांना खूप आनंद झाला. हा मोबदला घेण्यासाठी शेतक-यांना माझ्या ऑफिसमध्ये न बोलवता त्यांच्या त्यांच्या गावी किंवा जवळ पडेल अशा

ठिकाणी मोबदल्याचे वाटप व्हायचे. जीपमधून आठ-आठ, दहा-दहा लाखांचा खजिना घेऊन जावे लागे. त्यामुळे बरोबर दोन बंदूकधारी शिपाईही घेऊन जावे लागे.

अशा गावात किंवा ठरलेल्या ठिकाणी जेवणाची सोय नसायची. त्यामुळे शक्यतो घरून डबे न्यायचो. पण अडीनडीला सात-आठ जणांचं पिठलं-भात करण्याची वेळ आल्यास तलाठ्याला सांगून ठेवायचो की, एखाद्या शेतक-याकडे हे काम सोपवावं. समजा, कोण्या शेतक-याला जमिनीच्या मोबदल्याचे रुपये ५०२७५=२५ द्यायचे असतील तर त्यातले २५ पैसे खातेदार शेतक-यानेच जेवण करणा-या शेतक-याला द्यावे, अशी व्यवस्था तलाठी करी. अशा जमलेल्या पैशातून भात-पिठल्याचा खर्च सहज निघून येई.

होता होता हा सगळा कष्टाचा आणि प्रामाणिक-पणाचा व्यवहार कोथरूडचे तरुण माजी सभापती शिवाजीराव देशमुख यांच्या कानी गेला. माझ्या शिराळ्याच्या भेटीच्या वेळी ते मला घरी येण्याचा आग्रह करीत. मनुष्य अतिशय सच्छील, प्रामाणिक आणि निस्पृह असल्याने मीही त्यांच्या घरी जायचो. मला आवडतात म्हणून हिरव्यापिवळ्या रंगाच्या कुरड्या आणि पुरण-पोळीचा बेत ते आवर्जून करायचे.

आता शिवाजीराव देशमुखांबद्दल लिहिलं पाहिजे. ते प्रथम ग्रामपंचायतीचे अधिकारी होते. पुढे नोकरी सोडून राजकारणात शिरले. पंचायत समितीचे सभापती झाले. सभापती हे पद पाच वर्षांच्या मुदतीचे असते. पण अडीच वर्षांनंतर त्यांनी पद सोडून दुस-या सभासदास सभापती केले. १९७७-७८ च्या निवडणुका आल्या तेव्हा त्यांनी आमदारकीसाठी प्रयत्न सुरू केले. वसंतदादांचा त्यांना पाठिंबा होता. पण त्यांना काँग्रेसचं तिकीट मिळालं नाही. ज्या नव्या सभापतींना शिवाजीरावांनी चार्ज दिला होता, त्यांनी यशवंतरावांपर्यंत दाद मागितली. पण यशवंतरावही बदल करू शकले नाहीत. मग हे सभापती अशी प्रतिज्ञा करून आले की, शिवाजीरावांना विधानसभेवर निवडून आणीन आणि मगच पायात चपला घालीन. तसं त्यांनी करून दाखवलं. शिवाजीराव अपक्ष आमदार म्हणून निवडून आले. मीच त्यांचा रिटर्निंग ऑफिसर होतो. निवडणुकीचा निकाल मी जाहीर केला तेव्हा ते म्हणाले, "एवढं एकच पांढरं जाकीट माझ्याकडे आहे. मी बाहेर गेलो तर गुलालामुळे ते रंगून जाईल. उद्या विधानसभेत जाईन तेव्हा हे मला लागेल. तर आता तुमच्या खुर्चीला जाकीट लावून ठेवतो आणि बाहेर जातो." इतकं स्वच्छ वागणंबोलणं त्यांचं होतं. अशी व्यक्ती राजकारणात कशी, असं मला वाटायचं.

माझ्या भूसंपादनकार्यातला मोबदलावाटपाचा स्वच्छ प्रकार त्यांच्या नजरेला आला होता. त्यांनी काही दिवसांनी मला विचारलं, "साहेब, तुम्हाला प्रान्त ऑफीसर म्हणून पोस्टिंग मिळू शकते का?"

मी म्हणालो, "मला मिळू शकते; पण ती कव्हेटेड पोस्ट असल्यामुळे त्यावर पुष्कळांचा डोळा असतो व ते इच्छुक तसा प्रयत्न करतात. मी मात्र तशी खटपट कधीच करत नाही."

"मी तुम्हाला फक्तं ती पोस्ट इक्विव्हॅलंट आहे का, इतकंच विचारलं. ती तुम्हाला मिळवून द्यायची की नाही, ते मी पाहतो."– शिवाजीराव.

त्यांनी खटपट करून तशी ऑर्डर आणली. मला खूप आश्चर्य वाटलं. मी रुजू झालो. पण मला शंका वाटू लागली की, आता शिवाजीरावांची कामं करावी लागणार! कायद्याप्रमाणं त्याचं एखादं काम होऊ शकत नसलं, तर मला ते करायला लावण्यासाठी त्यांच्याकडून प्रेशर येणारच. मग मी माझ्या स्वभावाला धरून ती शंका ते ऑफिसात आल्यावर एकदा त्यांना विचारली. तेव्हा ते म्हणाले, "साहेब, तुम्हाला काय म्हणायचंय ते मला कळलंय. पण हे लक्षात ठेवा की, न होणा-या कामासाठी मी कुणालाही तुमच्याकडे पाठवणार नाही. त्यातून कुणी तुमच्याकडे माझं नाव घेऊन आलंच तर तुम्ही कायद्याप्रमाणेच त्याचं काम मार्गी लावा. मी आटापिटा करून तुमची ऑर्डर आणली त्यामागे माझा वेगळाच हेतू आहे. मला खात्री आहे की, माझ्या विरुद्ध असणा-या पुढा-यांची न होणारी कामं तुम्ही कधी करणार नाही आणि तेवढं मला पुरे आहे. गेली दोन-अडीच वर्ष मी तुमचं काम पाहतो आहे. तुम्ही योग्य तेच करणार. आता काही शंका?"

मी अवाक् झालो. अशीच निर्मळ स्वभावाची आणि

सदसद्विवेकबुद्धी असणारी माणसं राजकारणात हवीत, असे सांगून मी त्यांचे आभार मानले. नोकरदार आणि पुढारी याच भावनेने रयतेशी वागले, तर रयतेला काय कमी पडेल? आजतर त्याची खूप जरूर आहे.

भूसंपादन अधिकारीपदावर काम करीत असताना चांदोली धरणाच्या साडेसातशे एकर सब्मर्जन्स एरीयाचं संपादन माझ्याकडून एकाहाती झालं. त्या चौदा गावच्या आदिवासी मंडळींनी मला त्यांच्या भागात निरोप-समारंभासाठी बोलावलं. गरिबीचा शेला म्हणजे लंगोटी आणि शिरपेच म्हणजे मुंडासं घालून आलेल्या त्या कष्टकरी आदिवासींचं रूप पाहून खूप भरून आलं. त्यातल्या एका गावाच्या सरपंचानं पोत्यातनं सांबाराचं एक शिंग काढलं आणि मोठ्या प्रेमाने, मी नकोनको म्हणत असताना, माझ्या हाती दिलं. आमच्या प्रेमाची खूण म्हणून जपून ठेवा, असं सांगितलं. नंतर बिनदुधाचा चहा आणि पार्लेजीचा पुडा उपाहार म्हणून दिला. काय तो प्रसंग वर्णावा! मी मोठ्या प्रेमानं ते सांबरशिंग घरी लटकावून ठेवलंय.

✷✷✷

---

## श्री शंकराचार्य, श्री ज्ञानेश्वर व लोकमान्य टिळक–
## भगवद्‌गीतार्थ समन्वय (पूर्वार्ध)*

मो. वि. पटवर्धन

जगातील जे विविध धर्मग्रंथ आहेत, त्या सर्वांमध्ये भारतातील भगवद्‌गीतेचे महत्त्व हे अत्यंत 'अपूर्व' आहे. खरे म्हणजे जगातील जे निरनिराळे धर्म आहेत, त्या सर्वांचे त्यांचे स्वतःचे धर्मग्रंथ त्यांना अपूर्वच वाटतात. कारण ह्या सर्वांची त्याबद्दलची धारणाच अशी असते की, जगातील जे सर्व ज्ञान आहे, त्या सर्वांचे सार प्रत्येक धर्माच्या धर्मग्रंथात असून, त्याशिवाय त्यात त्यांचे स्वतःचे काही वैशिष्ट्य असते. त्यामुळे असे सर्व धर्मग्रंथ त्या त्या धर्माभिमान्यांना असाधारण वाटतात, ह्यात काही आश्चर्य नाही. असे असले तरीही त्या सर्वांत भगवद्‌गीतेचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे. कारण प्रत्येक धर्माचा धर्मग्रंथ त्या धर्माच्या अनुयायांनाच फक्त आदर्श वाटतो; इतरांना वाटत नाही. पण गीतेचे तसे नाही. जगातील सर्व धर्मांच्या, सर्व पंथांच्या लोकांना तो सारखाच पूज्य व म्हणूनच अपूर्व वाटतो.

ह्या घटनेचे कारण असे की, जसेजसे नवीन शास्त्रीय शोध लागू लागले तसेतसे गीतेशिवाय इतर सर्व धर्मग्रंथांतील विश्वोत्पत्ती व जीव ह्यांच्या उत्पत्तीचे वर्णन अशास्त्रीय अतएव चुकीच्या अनुमानावर आधारलेले आहे, हे स्पष्ट होऊ लागले. त्यामुळे शास्त्रीय शोधांचा व त्या धर्मग्रंथांचा समन्वय करणे सर्वथैव अशक्य झाले. गीतेचा प्रश्न मात्र निराळा होता. ह्या सर्व नवीन शास्त्रीय शोधांबरोबर गीतेतील तत्त्वज्ञानाचा समन्वय करणे सहज शक्य होते; इतकेच नव्हे, तर नवीन शोधांमुळे त्या तत्त्वज्ञानाचा पाया वरचेवर दृढ होत गेला. यातील दुसरे आश्चर्य म्हणजे नवीन शास्त्रीय शोधांनी पूर्वीचे शास्त्रीय सिद्धान्त चुकीचे ठरू लागले, तरी ह्या सर्व नवीन व जुन्या शास्त्रीय शोधांशी समरस होण्याची अशक्य किमया गीतेतील तत्त्वज्ञानाने करून दाखविली इ. स. १९०० पर्यंत वस्तू (Matter) व शक्ती (Energy) हे एकमेकांपासून सर्वस्वी निराळे आहेत अशी शास्त्रज्ञांची भावना होती. यांचेबरोबर गीतेतील द्वैत तत्त्वज्ञान सहज समरूप होऊ शकले. त्यानंतरच्या २५ वर्षांच्या काळात वस्तू व शक्ती ह्यांचा एकमेकांशी संबंध आहे इतकेच नव्हे, तर एकापासून दुसरे उत्पन्न होण्याची शक्यता आहे, हे शास्त्रीय तत्त्व रूढ होऊ लागले. ह्या कल्पनेशी गीतेतील विशिष्टाद्वैत समरूप झाले. आता वस्तू असा निराळा पदार्थच नसून सर्व जग (विश्व) शक्तीपासूनच निर्माण झाले, ह्या तत्त्वाचा पगडा बसू लागला आहे. ही कल्पना गीतेतील चिद्विलासवाद याच्याशी सर्वथा एकरूप आहे. ह्याप्रमाणे पूर्वीचे शास्त्रीय सिद्धान्त खोटे ठरू लागले व गीता जरी आहे तीच राहिली, तरी त्या सर्व बदलत्या शास्त्रीय शोधांशी समन्वय घडवून आणण्याची अफाट शक्ती मात्र गीता ह्या धर्मग्रंथात आहे, हे ह्या सर्वोत्कृष्ट धर्मग्रंथाने दाखवून दिले. तसेच आणखी नवीन शास्त्रीय शोध जरी लागले, तरी त्यांचाही समावेश करण्याइतकी आपली ताकद आहे हे तिने सिद्ध केले आहे. ह्या सर्वांमुळे इतर सर्व धर्मग्रंथांपेक्षा गीतेची योग्यता काही आगळी आहे, हे जगातील सर्व विद्वानांना पटू लागले आहे.

आज जगात अस्तित्वात असलेल्या सर्व धर्मांच्या तत्त्वज्ञानाकडे लक्ष देता, ती तत्त्वज्ञाने द्वैत, विशिष्टाद्वैत, अद्वैत ह्या परमेश्वरकल्पनेवरच आधारलेली असल्याने असे सिद्ध होते की, गीतेतील तत्त्वज्ञानात ह्या सर्व धर्मतत्त्वज्ञानांनासुद्धा सामावून घेण्याची शक्ती आहे. म्हणून यानंतर जर जगातील प्रजेस एका सर्वसंग्राहक धर्माची अगर धर्मग्रंथांची जरूर वाटेल, तर हिंदुधर्म व गीता ती जागा घेण्याच्या योग्यतेचे आहेत.

पण गीतेचा हा सर्वसंग्राहकपणाच कदाचित तिच्या जगद्धर्म-संस्थापनेच्या मार्गात येण्याचा संभव आहे. कारण भविष्यात सर्व जगातील लोकसंख्येने हिंदुधर्मास आपला

***नवभारत** डिसेंबर १९६६ मध्ये प्रकाशित झालेला हा लेख पुनर्मुद्रित करत आहोत.








एकधर्म मानण्याचे ठरविले व ह्या दृष्टीने गीतेस आपला धर्मग्रंथ मानला, तर त्याचा खरा तत्त्वज्ञानगाभा कोणता, हे आपण निश्चयाने ठरविणे जरूर आहे. असे केल्याशिवाय आपल्या धर्मात येणा-या नवागतांना ज्या वेळेस आपण आपला हिंदुधर्मग्रंथ म्हणून गीता देऊ, त्या वेळेस त्याचे तत्त्वज्ञान काय आहे हे ठामपणे आपणास सांगता आले पाहिजे. असे न झाल्यास व निरनिराळ्या लोकांनी गीतेचे तत्त्वज्ञान निरनिराळे सांगितल्यास, त्यामुळे हिंदुधर्मातील नवागतांच्या मनात संशय उत्पन्न होईल व हे धर्मसंस्थापनेस प्रतिकूल ठरेल. म्हणून आपण हिंदुधर्मीयांनी एकत्र विचार करून गीतेचे अंतिम तत्त्वज्ञान काय आहे, हे एकदा ठामपणे ठरविणे जरूर आहे. तेव्हा ह्या दृष्टिकोनातून आता आपण गीतातत्त्वज्ञानाकडे पाहू या.

हल्ली गीतेबद्दलचे हिंदुधर्माभिमान्यांचे विचार पहाता त्यातील काही थोडे वैष्णव, गीता ही द्वैतवादी तत्त्वज्ञानावर आधारलेली आहे, असे मानतात. वैष्णवांतील भागवतादी काही भाग गीता विशिष्टाद्वैत किंवा शुद्धाद्वैत तत्त्वज्ञान प्रतिपादन करते असे मानतो. पण हिंदुधर्मीयांचा बराच मोठा भाग गीता ही अद्वैत तत्त्वज्ञानावर आधारलेली आहे, असे मानतो. पण ह्या अद्वैततत्त्वज्ञानातही अवच्छेद प्रतिबिंब, परिणाम व माया असे निरनिराळे वाद आहेतच. शास्त्रीय दृष्ट्या विचार करता यातील संपूर्णपणे शास्त्रीय दृष्टीस बरोबर वाटणारा फक्त शंकराचार्यांचा अद्वैत मायावादच आहे व तोच गीतेच्या तत्त्वज्ञानाचा अंतिम भाग आहे.

श्रीमत् शंकराचार्यांचा हा एक विशेष आहे की, त्यात इतर सर्व वादांचा समावेश करण्याची शक्ती आहे. इतर कोणत्याही वादात ही ताकद नाही, म्हणून सर्व दृष्टीने विचार करता गीतेतील तत्त्वज्ञान हे अद्वैत-मायावादावरच आधारलेले आहे, असे सर्व हिंदुधर्मीयानी ठरविणे जरूर आहे. ज्या द्वैतवादी किंवा इतर वादाभिमानी विद्वानांना हे कबूल नसेल, त्यांनी आपला वाद सर्वंकष आहे, असे दाखविल्यास त्या वादाचाही अद्वैतमायावादा-बरोबरच विचार करता येईल. पण आजतरी त्याची शक्यता व जरूरी दिसत नाही.

पण ह्याप्रमाणे गीतेत अद्वैतमायावादच आहे असे ठरविले, तरी गीतेबद्दल आपल्या सर्व अडचणी संपत नाहीत. कारण अद्वैत मायावादामध्येही परत बरेच उपपंथ आहेत. कार्हीच्या मताने गीता अद्वैतमायावादी असली तरी प्रत्यक्षानुकरणात ती ज्ञानयोगवादी का कर्मयोगवादी का भक्तियोगवादी का ध्यानयोगवादी आहे, हे वाद शिल्लक राहतातच. त्यातही परत ज्ञानकर्मसमुच्चय शक्य आहे का ज्ञान व कर्म एका वेळेस येणे शक्य नाही असाही वाद आहेच. ह्या सर्व असंख्य मतामतांचा गलबला नाहीसा करून गीतेत एकच एक मुख्य तत्त्वज्ञान काय प्रतिपादन केले आहे हे सर्व हिंदुधर्मीयांनी ठरविणे जरूर असल्याने ह्या सर्व वादांचा समन्वय करणे कितपत शक्य आहे, हे पाहाण्याचा ह्या लेखात विचार आहे. असा गीतासमन्वय झाला तर विश्वहिंदुधर्मसंस्थापना निर्वेध होण्याची शक्यता आहे.

ह्यांपैकी द्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत चिद्विलास इत्यादी सर्व व अद्वैतमायावाद यांचा समन्वय करणे फारसे बिकट नाही. कारण अद्वैतमायावादाचा जो मोक्षसोपान आहे, त्यात हे सर्व मार्ग मोक्षसोपानाचे निरनिराळे टप्पे या स्वरूपात येतातच. किंबहुना द्वैत हा मूळ पाया मानूनच अद्वैतमायावादाची भव्य इमारत त्यावर उभारलेली आहे. इतर सर्व वादही तशाच स्वरूपाचे आहेत. अद्वैतमायावाद तत्त्वज्ञानात ह्या सर्वांचा मूलभूत गृहीततत्त्वे म्हणून समावेश झाला आहेच. अद्वैतमायावाद तत्त्वज्ञानास नाकबूल भाग म्हणजे निरनिराळी तत्त्वज्ञाने आपलेच निर्णय अंतिम आहेत असे मानतात, ती कल्पना होय. अद्वैतमायातत्त्वज्ञान म्हणते की तुम्ही आमच्या मार्गाने सरळ येता तो वेळपर्यंत तुम्ही सर्व (तत्त्वज्ञाने) बरोबर आहात, फक्त त्या त्या तत्त्वज्ञानाचा जो भाग अद्वैततत्त्वज्ञान मार्गाच्या बाहेर जाईल किंवा मध्येच थांबून हाच अंतिम शेवट असे प्रतिपादन करील, तोच भाग फक्त अद्वैतमायातत्त्वज्ञानास नाकबूल राहील. ह्यावरून थोडी देवाण-घेवाण केल्यास द्वैतादी इतर तत्त्वज्ञाने व अद्वैतमायातत्त्वज्ञान यांचा समन्वय होणे फारसे बिकट नाही.

हा हिंदुधर्मातील समन्वय जर आपण साधला, तर त्याचा एक अत्यंत मोठा फायदा हिंदुधर्मास मिळेल. तो म्हणजे इतर धर्मही द्वैततत्त्वज्ञानावर आधारलेले असल्याने, त्या धर्मांना व त्यांच्या तत्त्वज्ञानांना आपणास आपल्या

हिंदुधर्म अद्वैतमायातत्त्वज्ञानात समाविष्ट करून घेता येईल व अशा त-हेने हिंदुधर्माला विश्वधर्म होण्याची योग्यता व मान मिळेल.

पण अद्वैतमायावादांतर्गत सर्व उपपंथांचा समन्वय करणे मात्र अत्यंत बिकट कार्य ठरणे शक्य आहे. कारण त्यातील काही मुद्दे–ज्ञान व कर्म ह्यांचा समुच्चय शक्य आहे किंवा नाही, गीतेत ज्ञानयोगच किंवा कर्मयोगच आहे, तसेच ज्ञानोत्तर कर्म शक्य आहे की नाही–हे अत्यंत मूलग्राही स्वरूपाचे असल्याने त्यांचा समन्वय तम व प्रकाश यांच्या समन्वयासारखा अशक्य वाटतो. हाच समन्वय कितपत शक्य आहे, किंबहुना शक्यतेच्या कोटीत आणता येईल का? हाच विचार ह्या लेखात करावयाचा आहे.

अद्वैततत्त्वज्ञानाचे जे शुद्धाद्वैतवाद, चिद्विलासवाद व मायाद्वैतवाद आहेत, त्यांवर काही ना काही आक्षेप घेऊन त्यांचे खंडन करणे शक्य आहे. पण सर्वांत शंकराद्वैत-मायावाद ह्यावर अत्यंत कमी आक्षेप असल्याने तोच वाद अंतिम स्वरूपाचा ठरविणे जरूर आहे.

हा शंकराद्वैतमायावादच गीतेत प्रतिपादन केलेला आहे असे गृहीत धरून गीतेवर टीका लिहिणारांमध्ये अत्यंत प्रसिद्ध म्हणजे ज्यांना युगपुरुष असे म्हणता येईल, असे तीन महान विद्वान आहेत; ते म्हणजे श्रीमत् शंकराचार्य, श्रीज्ञानेश्वरमहाराज व लोकमान्य टिळक होत. ह्या तिघांच्या टीकेचा आशय एकमेकांच्या विरुद्ध आहे. श्रीमत् शंकराचार्य गीतेत ज्ञानमार्ग असून तोच अंतिम मोक्ष देण्यास समर्थ आहे, ज्ञान व कर्म हे तमप्रकाशवत् एकमेकांच्या विरुद्ध असल्याने त्यांचा समुच्चय करणे अशक्य आहे असे प्रतिपादन करतात. श्रीज्ञानेश्वरमहाराज ज्ञानेश्वरीत श्रीशंकराचार्यांचे प्रतिपादन मान्य करतात; पण त्या जोडीला 'भक्ती' हा सर्वांना उपलब्ध असणारा मार्ग अनुसरल्यास सर्वांना मुक्ती मिळते व हाच भक्तिमार्ग गीतेत आहे, असे सांगतात. लोकमान्य टिळकांचे मत मात्र ह्या दोघांच्या सर्वस्वी विरुद्ध आहे. ते ज्ञान व भक्ती गीतेत आहेत ह्यास नाकबुली देत नाहीत, पण गीतेत त्यांचे स्थान गौण, म्हणजे कर्ममार्गाला पूरक स्वरूपाचे आहे व गीतेत फक्त कर्ममार्गच सांगितला आहे, असे निक्षून ठरवितात. तसेच ज्ञान व कर्म या दोन्हींची मोक्षास जरूरी असल्याने ज्ञानकर्मसमुच्चय होणे जरूर आहे असे प्रतिपादन करतात. ह्यावरून ह्या सर्वांच्या मताने फक्त ज्ञानमार्ग, फक्त भक्तिमार्ग अगर फक्त कर्ममार्ग असून इतरांची उपस्थिती गौण स्वरूपाची आहे, असे दिसते. तेव्हा गीतेला आपणास विश्वधर्मग्रंथाची योग्यता आणण्यास यांतील कोणता योग गीतेत आहे हे निश्चित ठरविणे व तसे करताना त्यात सर्व योगांचा समन्वय होतो का नाही, ह्याकडे लक्ष देणे जरूर आहे.

हा समन्वय साधण्याच्या अगोदर ह्या तीन महान विद्वानांचे गीतेबद्दलचे निष्कर्ष काय आहेत, हे समजून घेणे जरूर आहे. त्यामुळे समन्वयाच्या संपूर्ण कक्षा ध्यानात येण्यास मदत होईल.

श्रीभगवद्गीता भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनास भारतयुद्धाचे अगोदर सांगितली हे सर्वांना माहीत आहेच. त्या वेळी आपले गुरू, मित्र व नात्याचे इतर बांधव यांच्या बरोबरच युद्ध करून व त्यांचा निःपात करून आपणास विजय मिळवावयाचा आहे, ही गोष्ट प्रथमच अर्जुनाच्या मनावर ठसली. त्यामुळे तो किंकर्तव्यमूढ होऊन युद्धापासून परावृत्त झाला. म्हणून त्या वेळी भगवान श्रीकृष्णांनी त्याला गीता सांगून परत युद्धास प्रवृत्त केले, हा यामागील इतिहास आहे.

ही श्रीकृष्णांनी अर्जुनास सांगितलेली गीता श्रीव्यास ऋर्षीनी आपल्या दिव्य ज्ञानाने जाणून त्यांचे श्लोकात रूपांतर करून ती महाभारतात प्रसिद्ध केली. हेच गीतेचे आजचे स्वरूप आहे.

ह्याच गीतेवर श्रीमत् शंकराचार्य, श्रीज्ञानेश्वर व श्रीलोकमान्य टिळक यांनी टीका लिहिलेल्या असून त्या तिघांचे निष्कर्ष निरनिराळे आहेत, त्याचाच आपणास विचार करावयाचा आहे.

श्रीशंकराचार्यांची टीका–गीताभाष्य–ही इतकी प्रभावी आहे व वाचताना वाचक त्यांच्याशी इतका समरस होतो की, ह्याशिवाय गीतेचा दुसरा निष्कर्ष असेल, असा त्याला संशयसुद्धा येत नाही. यामुळे श्री शंकराचार्यांच्या अगोदर असलेल्या गीतेवरील सर्व टीका लुप्त झाल्या व त्याचा प्रभाव अद्यापपर्यंत चालू आहे. आजसुद्धा श्रीशंकराचार्यांचेच भाष्य बरोबर आहे, अशी बहुतांश

हिंदुधर्माभिमान्यांची खात्री आहे व हेच स्वरूप शेवटपर्यंत टिकणार आहे; कारण तेच अंतिम स्वरूपाचे आहे. श्रीभगवद्‌गीतेची विश्वधर्मग्रंथ म्हणून ख्याती प्रस्थापित करावयाची असल्यास गीताभाष्याचे तत्त्वज्ञान व निष्कर्षच सर्वंकष व सर्वव्यापी आहेत.

श्रीशंकराचार्यांचे तत्त्वज्ञान सारांशरूपाने माझ्या यापूर्वीच्या गीतेवरील कर्ममार्ग व ज्ञानमार्ग या लेखात दिलेले आहे ते असे : "समूळ संसाराचा कायमचा नाश या लक्षणाने युक्त असलेले जे सर्वोत्कृष्ट कैवल्य, ते ह्या गीताशास्त्राचे संक्षेपतः फल होय. ते कैवल्य सर्व कर्मसंन्यासपूर्वक जी आत्मज्ञाननिष्ठा तिच्यापासूनच होते. 'ब्रह्मपदाची प्राप्ती करून देण्यास तो धर्मच समर्थ आहे' असे भगवंतांनीच अनुगीतेमध्ये ह्या गीतार्थाने निश्चित होणा-या ज्ञाननिष्ठारूप धर्माला उद्देशून म्हटले आहे. तसेच बाह्येंद्रिये व्यापाररहित असून अंतःकरणातही कसले चिंतन करिता केवळ अद्वितीय ब्रह्माचेच ठिकाणी लय लावून जो बसलेला असतो त्याला धर्म, अधर्म, शुभ, अशुभ ह्यांचा संपर्क होत नाही. असंप्रज्ञात समाधिनिष्ठ पुरुषांचे सर्वकर्मत्यागजन्य ज्ञानच मुक्तीला कारणीभूत होते ...... सर्व धर्म व अधर्म ह्यांचा त्याग करून म्हणजे सर्वात्मा, सर्वभूतांतर्यामी वगैरे मीच आहे, माझ्याहून दुसरे काहीही नाही असे जाण."

श्रीमत् शंकराचार्यांचे गीताभाष्य वाचताना हेच विचार सर्वत्र विखुरलेले दिसतात. यावरून दोन महत्त्वाचे निष्कर्ष निघतात : (१) सर्वोत्कृष्ट कैवल्य हेच गीताशास्त्राचे फल असून ते सर्वकर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञाननिष्ठेनेच प्राप्त होते. याचा अर्थ गीतेत 'ज्ञानयोग' सांगितलेला आहे. (२) असंप्रज्ञात समाधिनिष्ठ पुरुषाचे सर्वकर्म-त्यागजन्य ज्ञानच मुक्तीला कारणीभूत होते. ह्यावरून असे स्पष्ट होते की, ज्ञानयोगी जो असेल त्याने मुक्ती मिळविण्याकरिता सर्वकर्मत्याग करून संन्यास घेणे जरूर आहे. मुक्ती मिळवावयाची असल्यास ज्ञान व कर्मसमुच्चय साधता येणार नाही. फक्त ज्ञानच मुक्ती देऊ शकेल.

शांकरमतानुयायी विद्वान गीतेत कर्मयोग, भक्तियोग व ज्ञानयोग असे तीन योग असून गीतेतील पहिले एक ते सहा अध्याय कर्मयोग, सात ते बारा अध्याय भक्तियोग व तेरा ते अठरा अध्यायात ज्ञानयोग आहे, असे प्रतिपादन करतात. पण श्रीशंकराचार्यांचे गीताभाष्य वाचताना त्यात मुख्यतः ज्ञानयोगच प्रतिपादला असून कर्ममार्गाचा उल्लेख दुय्यम स्वरूपाचा म्हणून आहे, पण भक्तियोगाला तेथे जवळजवळ स्थान नाहीच, असे दिसून येते. ध्यान-योगाचीही तीच गत आहे. ह्यावरून श्रीशंकराचार्यांच्या मते गीतेत ज्ञानयोग व कर्मयोग हे दोनच योग असून त्यात ज्ञानयोग हा मुख्य व कर्मयोग हा गौण आहे. मूळ गीतेकडे लक्ष दिल्यास त्यातही योग म्हणून ज्ञानयोग व कर्मयोग असे फक्त दोनच योग आहेत. भक्ती व ध्यान ह्यांच्याकरिता गीतेत अध्याय असले, तरी त्यांचा उल्लेख भक्तियोग व ध्यानयोग असा निराळा नाही. मग हा भक्तियोग आला कोठून? ह्याचा विचार नंतर करू. श्रीशंकराचार्यांच्या प्रतिपादनात दुसरीही एक मुख्य गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. ती म्हणजे जरी त्यांनी ज्ञानमार्गाने मोक्ष मिळतो असे म्हटले आहे, तरी कर्मयोगाने मोक्ष मिळत नाही असे विधान केलेले नाही. कर्ममार्गाबद्दल त्यांचे एवढेच म्हणणे आहे की, कर्ममार्ग हा एक पूरक मार्ग असून त्यामुळे ज्ञानमार्गाची योग्यता प्रत्येक मनुष्याला मिळवता येते.

गीताभाष्याच्या प्रस्तावनेत श्रीशंकराचार्यांनी ज्ञान-मार्ग व कर्ममार्ग यांचा एकमेकांशी संबंध काय आहे, हेही दाखवले आहे. सर्व मानव त्यांनी ज्ञानी व अज्ञानी अशा दोन गटांत विभागलेले आहेत. यात ज्ञानी म्हणजे विद्वान व अज्ञानी म्हणजे मूर्ख असा अर्थ नसून 'ज्ञानी' म्हणजे ब्रह्म अथवा निर्गुण परमेश्वराविषयी ज्यांचे ज्ञान यथार्थ आहे व त्यामुळे ज्यांना प्रथमपासूनच वैराग्य उत्पन्न झालेले असते व जे संसाराच्या भानगडीत पडत नाहीत, ते. ह्या गटाचे प्रतीक म्हणून सनक-सनंदन इत्यादी ऋषी त्यांनी दिले आहेत. अज्ञानी म्हणजे परमेश्वर-स्वरूपाची ज्यांना योग्य कल्पना आलेली नसते व त्यामुळे जे संसारात रममाण होतात, ते. याचे उदाहरण म्हणून त्यांनी मरीची आदी ऋषी दिलेले आहेत. यांतील सनक-सनंदन यांच्याकरता ज्ञानमार्ग असून मरीची आदी अज्ञांकरता कर्ममार्ग आहे. ज्ञानी सुरुवातीपासूनच विरक्त असतात म्हणून शरीर धारणार्थ अत्यंत जरूर तेवढीच कर्मे करून ज्ञानमार्गाने परमेश्वराकडे जाण्याचा प्रयत्न करतात व त्यामूळे त्यांना संपूर्ण सायुज्यमुक्ती मिळते.










हे शरीरपोषणार्थ जी कर्मे करणे जरूर असते, त्याचासुद्धा शक्यतो संकोच करून सर्व इंद्रियांचे नियमन करतात. त्यामुळे त्यांना ज्ञानमार्ग अत्यंत सुलभ असतो. ज्ञानमार्ग हा अनुभूतीवर आधारलेला असल्याने व यातील अंतिम टप्पा हा त्याच्या संपूर्णतेवर अवलंबून असल्याने अत्यंत जरूरीपेक्षा थोडेही जास्त कर्म घडल्यास त्या प्रमाणात अनुभूतीत कमीपणा येतो. यःकश्चित उणेपणासुद्धा संपूर्णतेत अडथळा आणीत असल्याने सायुज्यमुक्ती शक्य होत नाही. ज्यांना सायुज्य मुक्ती पाहिजे त्याना कर्मापासून संपूर्णपणे अलिप्त राहणे जरूर असल्याने व शरीरपोषणार्थ अत्यंत जरूर असलेल्या कर्माशिवाय इतर कोणतेही कर्म करणे हे त्यांच्या मोक्षमार्गात अडथळा उत्पन्न करत असल्याने, ज्ञान व कर्म ह्यांचा समुच्चय होणे शक्य नसते. म्हणूनच श्रीशंकराचार्यांनी ज्ञान व कर्मसमुच्चय सायुज्यमोक्षप्राप्तीत शक्य नाही, असे स्पष्ट विधान केले आहे.

मग प्रश्न असा येतो की, फक्त ज्ञानमार्गानेच जर मोक्ष प्राप्त होत असेल, तर कर्ममार्गाचे काय हा प्रश्न उरतोच. गीतेत तर कर्ममार्ग व ज्ञानमार्ग हे दोन्हीही मोक्षाला नेतात, असे स्पष्ट विधान आहे (भगवद्गीता ५-२); इतकेच नव्हे, तर त्यात संन्यासापेक्षा कर्ममार्ग जास्त प्रशस्त म्हणून सांगितले आहे. त्याचा समन्वय श्रीशंकराचार्यांच्या प्रतिपादनाशी कसा करावयाचा, ह्याचे उत्तर श्रीशंकराचार्यांनीच दिलेले आहे.

संपूर्ण मोक्ष किंवा सायुज्यमोक्ष फक्त ज्ञानमार्गाने मिळतो व ह्याची सुरुवात वैराग्याने होते. आता जन्मल्याबरोबर ज्यांच्यात वैराग्य बाणलेले असते, अशा व्यक्ती अत्यंत दुर्मीळ असतात. जगातील सर्व मानव घेतले, तर त्यात जन्मापासून वैराग्य बाणलेले मानव लाखात एक असे असतील. म्हणजे जन्मल्याबरोबर ज्ञानमार्गाने जाणा-या व्यक्ती अत्यंत अल्प प्रमाणात असतात. संपूर्ण वैराग्य आल्याशिवाय ज्ञानमार्गाचा अधिकारही प्राप्त होत नाही. जगातील बहुतांश लोकांना मोक्ष मिळवण्याकरिता वैराग्य आपल्या अंगात आणावयाचे असेल तर त्यांना अत्यंत उपयोगी म्हणजे कर्ममार्ग. कर्मामार्गात वैराग्याची बिलकूल जरूरी नसून 'अभ्युदयाची इच्छा' येथूनच तो मार्ग सुरू होतो आणि ही भावना तर जवळजवळ सर्व मानवांत असते. यात प्रत्येकाच्या वाट्यास श्रमविभागतत्त्वावर एखादे काम अगर धंदा येतो. तो त्याने मनःपूर्वक करावयाचा असतो. हे करताना त्यांना पुत्रैषणा, वित्तेषणा व लोकैषणा बाळगण्यास संपूर्ण वाव असतो. त्या कारणाने त्यांना विवाह करून संसारात पडणे, द्रव्य मिळवणे व शास्त्रात सांगितलेल्या नियमानुसार त्याचा यथेच्छ उपभोग घेण्याचे स्वातंत्र्य असते. इंद्रियांना त्यांच्या उपभोग्य वस्तू शास्त्राच्या मर्यादेत भोगण्यासही मोकळीक असते. अशा त-हेने क्रमाने सर्व इंद्रियजन्म सुख उपभोगता भोगता, ज्या वेळेस येईल, त्या वेळेस वैराग्यास येण्यास मार्ग मोकळा करून दिलेला असतो व हेच सर्वसाधारण मानवाचे ध्येय असते. त्याने आपले कार्य अगर धंदा हा परमेश्वराने आपणास दिलेला असून आपण त्याचेच काम करत आहोत, ही भावना ठेविल्यासच त्यांच्यात हळूहळू वैराग्य उत्पन्न होऊ लागते. अशी मूलभूत कल्पना न ठेविल्यास मात्र त्यास वैराग्य कधीच उत्पन्न होत नाही; इतकेच नव्हे, तर सुखोपभोग घेण्याचा त्याचा हव्यास वाढत राहतो व सुखोपभोग घेण्याची शक्ती मात्र दिवसेंदिवस कमी होत जाते. ह्यामुळे मनातील हेवा व दुष्टपणा वाढत जातो व इंद्रियांचा दुरुपयोग करून विपरीत पद्धतीने सुखोपभोग घेण्याची इच्छा बळावते व त्याचा शरीरावर व मनावर दुष्परिणाम होऊन असा मानव समाजाविरुद्ध गुन्हेगारी करण्यास मागे पुढे पहात नाही व त्याची नीतिपातळी निकृष्ट बनते. पण परमेश्वराचे अधिष्ठान असल्यास व सुखोपभोग शास्त्राच्या मर्यादेत राहूनच घेतल्यास, जशीजशी इंद्रियातील उपभोगशक्ती कमीकमी होत जाते, तसेतसे वैराग्याचे प्रमाणही वाढत जाते. अशा त-हेने कर्ममार्गाने इंद्रियांना त्यांच्या त्यांच्या सुखेच्छेचे विषय उपलब्ध करून देऊन, त्यांच्या उपभोगानेच, क्रमाने मानवात संपूर्ण वैराग्य उत्पन्न होते. असे वैराग्य उत्पन्न झाले म्हणजे तो मानव ज्ञानयोगाचा अधिकारी होतो आणि येथून त्याने संन्यास घेतल्यास त्याचा ज्ञानमार्ग सुरू होतो. या वेळेस त्याला यमनियम पाळणे सोपे जाते. कर्ममार्गाने इंद्रियजय साध्य झाल्याने यानंतर ध्यानमार्गाने चित्तवृत्तिनिरोध, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधी हा मार्ग अत्यंत सोपा होतो; कारण त्याच्या सर्व इच्छांचा संपूर्ण निरास झालेला

असतो. म्हणून अशा कर्ममार्गी माणसाला शेवटी ज्ञानमार्गाने सायुज्यमुक्ती मिळविणे सोपे असते. हा मार्ग सर्वसामान्य माणसाकरिता असल्याने तो सर्वांना अनुसरणे शक्य आहे. संन्यासमार्ग मात्र बिकट आहे. म्हणूनच गीतेत संन्यासापेक्षा कर्ममार्ग विशेष प्रशस्त आहे, असे विधान केलेले आहे व बरोबर हाच श्रीशंकराचार्यांच्या गीतेतील भाष्याचा कर्ममार्गप्रतिपादनाचा मूलगाभा आहे. श्रीमत् शंकराचार्यांचे गीताभाष्य काळजीपूर्वक वाचल्यास वरील कर्ममार्गाचे विवेचन सर्व गीताभाष्यात व मुख्यतः त्याच्या प्रस्तावनेत आढळून येईल. पण संपूर्ण गीताभाष्य वाचल्यावर त्यात ज्ञानयोग इतक्या भरपूर व समर्पक रीतीने मांडलेला आहे की, शेवटी गीताभाष्यात फक्त ज्ञानयोगच आहे, अशी वाचकांची भावना होते व त्यातील कर्ममार्गप्रतिपादनाकडे दुर्लक्ष होते. श्रीशंकराचार्यांवर नंतर ज्या प्रखर टीका झाल्या, त्या गीतेत फक्त ज्ञानयोगच त्यांनी सांगितला आहे ह्या कल्पनेवरच होत्या. तसेच त्यात भक्तिमार्गाचेही विस्तृत विवेचन नाही, हाही टीकेचा विषय आहेच.

पण यापेक्षा श्रीशंकराचार्यांविरुद्ध होणा-या टीकेचे कारण म्हणजे सायुज्यमुक्तीला फक्त ज्ञानयोगच उपयोगी आहे, ज्ञान व कर्म ह्यांचा समुच्चय शक्य नाही, हे त्यांचे महत्त्वाचे प्रतिपादन होय.

ज्ञानयोगच फक्त सायुज्यमुक्तीला उपयोगी, तर मग कर्ममार्गाचे काय? गीतेत तर दोन्ही मार्ग मुक्ती मिळवण्यास पात्र आहेत, असे स्पष्ट विधान आहे. ह्याचा समन्वय श्रीशंकराचार्यांनी गीताभाष्यात केलेला आहे, पण तो इतका त्रोटक आहे की, गीताभाष्य काळजीपूर्वक वाचल्याशिवाय तो लक्षातच येत नाही. गीताभाष्यातील कर्ममार्गविवेचनाकडे वाचकांचे दुर्लक्ष होत असल्याने असा एक महत्त्वाचा प्रश्न येतो की, सामान्य जनांना भगवद्गीतेचा उपयोग काय?

धर्म ह्या संस्थेची उत्पत्ती मानवाच्या मानसिक व ऐहिक समाधानाकरिता आहे व त्या धर्माच्या प्रत्येक अनुयायास त्यांचे अंतिम ध्येय साध्य होण्याचे मार्ग धर्माने दाखविले पाहिजेत. तसे दाखविले नाहीत तर तो धर्म निरुपयोगी ठरेल. हिंदुधर्माचे अंतिम ध्येय मोक्ष हे आहे. ते जर ज्ञानयोगाशिवाय साध्य होणार नसेल, तर हिंदुधर्म सामान्य मानवांना निरुपयोगी समजला पाहिजे. कारण एकंदर सर्व मानवांचा विचार केल्यास त्यात ज्ञानयोगाचे अधिकारी लाखांत एक ह्या प्रमाणात असणार. बाकी ९९,९९९ लोकांना मोक्षाला वंचित होणे भाग असेल, तर ह्या बहुतांश लोकांनी त्या धर्माचे अनुयायी कशाकरता व्हावयाचे, हा प्रश्न उत्पन्न होतो. शंकराचार्यांनंतरच्या रामानुजाचार्य, माधवाचार्य, वल्लभाचार्य इत्यादी महान आचार्य व श्रीज्ञानेश्वर व लोकमान्य टिळक आदी वसुधैव कुटुंबकम् असे मानणारे महानुभाव यांनी ह्या दृष्टीनेच गीता भाष्यावर प्रखर टीका केली. पण गीताभाष्य इतके प्रभावशाली व मूलग्राही आहे की, ह्या सर्व टीकांचा त्याच्यावर अद्यापही यत्किंचित परिणाम झालेला दिसत नाही. यातील पूर्वाचार्यांचा गीताभाष्याशी समन्वय कसा होतो, हे पूर्वीच सांगितले आहे. आता फक्त अद्वैत मायावादी श्रीज्ञानेश्वर व लोकमान्य टिळक यांचे विचार गीताभाष्यात कसे अंतर्भूत करावयाचे, हे पहाणे जरूर आहे.

श्रीशंकराचार्यांच्या जीवनकार्याकडे पाहिल्यास हिंदुधर्मास विश्वधर्माची योग्यता आणण्याकरिताच त्यांनी आपली शक्ती खर्च केली, असे दिसते. त्याच वेळेस त्यांनी सामान्य माणसेच प्रत्येक धर्मानुयायामध्ये असतात, हे लक्षात आणून गीताभाष्यात जो ज्ञानमार्गावर भर दिला, त्याऐवजी कर्ममार्गावर भर देऊन त्यांनी गीताभाष्य लिहिले असते, तर त्यांनी अंगीकारलेले कार्य जास्त उत्तम त-हेने प्रत्यक्षात आले असते व नंतरच्या आचार्यांना त्यांच्यावर टीका लिहिण्यास त्यानी जागाच ठेवली नसती व मलाही गीताभाष्यास विश्वधर्मग्रंथ करण्यास जी खटपट करावी लागणार आहे ती करण्याची जरूरी पडली नसती. तेव्हा श्रीशंकराचार्यांना ज्ञानयोगासच कर्मयोगापेक्षा जास्त महत्त्व देण्याची जरूरी का वाटली, ते पहाणे जरूर आहे.

आम्ही पूर्वी म्हटल्याप्रमाणे गीतेवर श्रीशंकराचार्यांच्या अगोदर ब-याच टीका असल्या पाहिजेत. ह्या टीका श्रीशंकराचार्यांच्या गीताभाष्याच्या प्रभावाने लुप्त झाल्या. ह्या पूर्वटीकांचे अस्तित्व, श्रीशंकराचार्यांनी आपल्या गीताभाष्यात त्याचा निर्देश केला आहे. त्यामुळे आपणांस समजते. ह्या सर्व पूर्वटीका कर्ममार्गी असून त्यांत ज्ञानकर्मसमुच्चय प्रतिपादन केलेला होता. म्हणजे लोकमान्य टिळक ह्यांनी नंतर गीतेचा जो अर्थ केला










पाखरांना। तर निसवण्याआधीच। पिचकली कणसं पोग्यातून' असे उपहासाने म्हणते.

या कवयित्रीच्या रोमारोमांत शेती आणि मातीचे प्रेम भरले आहे. ती हाडाची शेतकरी आहे, हेही त्यातून स्पष्ट होते. त्या दृष्टीने 'सखा', 'नवलख जीव', 'सत्त्व', 'गवताचा वास', 'जपेन मी', 'पेरले नाहीत नकार आपण', 'शेवट बदलले असते' इत्यादी कविता उल्लेखनीय आहेत. 'सत्त्व' कवितेत पावसासाठी ग्रामदैवताला केलेली प्रार्थना कवयित्रीचा श्रद्धाभाव दाखविते, तर 'शेवट बदलले असते' मध्ये शहरीकरणामुळे उद्‌ध्वस्त होणारे ग्रामीण जीवन आणि शेतीचे उद्‌ध्वस्तीकरण स्पष्ट होते. ही कवयित्री आता विज्ञानाच्या आधारे शेती करते, पण समाजातील लोकसंकेत तिला सजग करतात. उदा., रास भरताना डोळ्यावर पदर घ्यावा आणि माणसांनी टोप्या घालाव्यात इत्यादी. म्हणून कवयित्री 'शास्त्र' कवितेत स्वतःलाच प्रश्न विचारते, 'सांग बाई। हे मूठभर बी। तुझ्या सांगीव शास्त्रावर लावू। की माझ्या शिकावू?' संस्कृती आणि विज्ञान यांच्या पेचात सापडलेलं हे कविमन येथे व्यक्त झाले आहे.

(४)

या कवितेची दोन प्रमुख केंद्रे जाणवतात. एक शेतीमातीशी निगडित भावना व विचार आणि दुसरे म्हणजे समाजातील व शेतीतील जाणवणारी स्त्रीची विविध रूपे होत. या कवितेत स्त्री आजी, आई, मुलगी, सासुरवाशीण, कुटूंबातील आधार अशा विविध रूपात प्रकटली आहे. शेतीमाती, पीकपाणी, लोकसंकेत, मिथके इत्यादींचा तिला चांगलाच परिचय आहे. त्यामुळे स्त्री या कवितेचे एक प्रमुख केंद्र आहे, हे पदोपदी जाणवते.

'सौंदड' या चिवट वनस्पतीत कवयित्री स्त्रीरूप पाहते. सौंदडच्या झाडावर पांडवांनी विश्वासाने आपली शस्त्रे ठेवली. पाखरे उन्हापावसात या झाडाचा आश्रय घेतात. हिंदूंच्या लग्नकार्यातील देवकप्रसंगी सौंदडचे पावित्र्य मिथक म्हणून मान्यता पावलेले आहे. अशा चिवट वृक्षाला मानवी रूपात पाहून कवयित्री तिच्या खरबुडीत बुंध्याशी एकरूप होऊ पाहते. या बहुचर्चित बहुगुणी 'सौंदड'कडे कवयित्री वंशसातत्याच्या दृष्टीनेही पाहते, ही दृष्टी स्त्रीसुलभ भूमिकेतूनच अभिव्यक्त झाली आहे.

एका बाजूला शेतकरी आपली डाळिंबं निर्यात करून प्रतिष्ठा वाढवितो, तर दुसरीकडे पोटची पोर 'शब्दानं न बोलता' घर सोडून पळून गेल्यावर आईची होणारी 'मुस्काडबंदी' आणि वडिलांची 'अप्रतिष्ठा' हे समाजातील वास्तव कवयित्री प्रसरणशील शब्दांतून व्यक्त करते. कष्टाने वाढवलेली लाडाची पोर आणि बहिणीबाळींची चोळीबांगडी करणा-या बापाची कशी बेइज्जत होते, हे मुळातूनच वाचले पाहिजे.

माहितगार बाईसारखी वेणा देणारी गाय झुडपाआड जाऊन बसल्यावर आणि वासरास जन्म दिल्यावर पोरापोरींची प्रतिक्रिया लिंगभेदातून कशी व्यक्त होते, हे कवयित्रीने 'माळावर गुरं राखताना' या कवितेतून अत्यंत वास्तव स्वरूपात सांगितले आहे. 'गायचं आणि बायचं सारखंच असतं', अशा उद्‌गारातून पोरांनी पोरींकडे पाहून हसण्यापेक्षा स्त्रीची सृजनशीलता येथे अभिव्यक्त होते. मातीमधील बियाणे, गवत हे मातीचेच 'गणगोत' असल्याने एका शेतकरीण स्त्रीला ते शेतातून काढणे जिवावर येते. कारण शेतातील माती आणि स्त्री एकरूपच मानण्यावर कवयित्रीची निष्ठा आहे.

गावातील चार वृद्ध विसरभोळ्या स्त्रिया आणि त्यांची भ्रमिष्टावस्था 'पखालीचं पाणी' या कवितेतून सूक्ष्म निरीक्षणातून मार्मिकपणे व्यक्त झाले आहे. त्यांचे एकंदर वागणे म्हणजे 'जसं चॅवमॅव चॅवमॅव पखालीचं पाणी'. त्यांची ही अवस्था ज्या कुटुंबांनी केली, त्याबद्दलची मूळ व्यथाच कवयित्री सांगते. एकंदरीत म्हाता-या स्त्रियांची शून्य-भ्रमिष्ट अवस्था ही दयनीय आहे, याबद्दलची स्त्री म्हणून जाणवणारी सहानुभूतीही येथे अधोरेखित होते. 'आयुष्यभराचा कापूस पिंजतच' त्यांचे आयुष्य भंगलेले आहे. म्हणून त्या समदुःखी आहेत. त्यांचे जीवन पखालीतील पाण्यासारखे नकळत सरते आहे.

एखादी 'अश्विनी'सारखी निरपराध सून छळवादातून कीटकनाशक पिऊन आत्महत्या करते, या घटनेनंतर कारणे आणि परिणामाकडे नातीगोती, समाज डोळेझाक करून आपले जीवनाचे चक्र सुरू ठेवतो. हे मनस्वी शल्य व्यक्त करताना कवयित्री म्हणते, 'थरथरत्या ओठांत न मावणारी । संपलेल्या आईची गोष्ट। कशी सांगणार होते मी। किंवा आणखी कुणीही। तिच्या लेकरांना'

(पृ. ३८). स्त्री-पुरुष समानता मानणा-या या समाजात मुलांना सख्ख्या आईची माया कशी मिळेल? हा खरा प्रश्न आहे. अशा कितीतरी घटना प्रत्यही घडतात. ही अबला सबला कधी होईल? किंबहुना अशा घटनांचे कीर्तनकारही कसे उदात्तीकरण करतात, याचे दुःख येथे प्रकटले आहे.

ग्रामीण शेतकरी स्त्री आपल्या दैनंदिन कामात गढून जाते. शेतीमातीशी अखेरपर्यंत एकनिष्ठ राहताना म्हणते, 'तळतळीत उन्हात। झाडाझुडपांत पेंगायचं सोडून। कावळा होऊन औताभोवती भिरभिरेन। औतक-याच्या घामावर। पंखांची फडफड पसरेन' (पृ. ४१). अशी ही निष्ठावंत स्त्री कवयित्रीने साकारली आहे. यात या कवयित्रीचे दुसरे रूप जाणवत राहते. आत्मप्रत्ययाशिवाय अशी अभिव्यक्ती शक्य नसते. त्यामुळेच ही कवयित्री बरकतीसाठी 'रास म्हणून काणी पिकवलीस। तरी काणीतला बुक्का कपाळाला लावून। जपेन माझं सत्त्व' अशी धरतीकडे प्रार्थना करते. 'सखा' सारख्या कवितेतील अपुरेपणाची जाणीव अस्वस्थता वाढविते. शेतक-याची शेरडी अडचणीमुळे विकायला न्यावी लागते. पण ती सांभाळणा-याला देण्याऐवजी चलाखीने खाटिकच खरेदी करतो. त्यामुळे होणारे दुःख कुटुंबाला असह्य होते. ती शेरडी म्हणजे शेतक-याला आपल्या नांदायला जाणा-या मुलीसारखीच असते.

'रक्ट नेसण्याची गोष्ट' या कवितेत एका जिद्दी करारी आजीचे शब्दचित्र कवयित्री रेखाटते. तोच करारीपणा कवयित्रीला अभिमानस्पद वाटतो. 'खोटं बोलल्यावर। जीभ झडेल म्हणणारा नम्रपणा। रक्ट नेसावं पण कुणाचं नक्ट नसावं। असा करारीपणा। काळ्या दगडावरच्या रेघांसारखा। कोरलास माझ्यात' (पृ. ८९).

कवयित्रीच्या या शब्दांतून तिचाही सत्त्वशील करारीपणा वाचकांना प्रत्ययास येतो. म्हणून कवयित्री जन्मोजन्मीचे नाते जपण्यासाठी आजीला आपली नात होण्याचे सलगीने विचारते. या कवितेसारखीच 'आधीच ऐकू येतं' या कवितेत आई-मुलीचा वात्सल्यभाव आणि स्नेहशील नाते अभिव्यक्त झाले आहे. मुलीचे लाडाकोडाचे कौतुक करूनही कवितेतील खानदानी आई म्हणते, 'मी तुझ्या पंखांवर नकली रंग लावणार नाही। की माझ्या विश्वासावर नकली मुलामा चढवणार नाही' (पृ. ५४). या शब्दांतून मुलीला तिचे अस्तित्व कळावे, तिचा स्वाभिमान टिकावा हीच अपेक्षा व्यक्त होते. खोटी आश्वासने देऊन तिला ती पंगू करू इच्छित नाही. अशा रीतीने स्त्रीची विविध रूपे कवयित्रीने अर्थबहुल आणि प्रसरणशील व्यक्त केली आहेत.

(५)

दोन पिढ्यांतील अंतर, आई-बापांबद्दलची अनास्था, कुटुंबविघटन, त्यातून निर्माण होणारे प्रश्न, माणुसनकीहीनता, स्वार्थांधता, जागतिकीकरण, महासत्ता, राजकारण यांसारखे विषयही या कवितेत चिंतनाच्या पातळीवर आले आहेत. त्यातून या कवयित्रीचे परिपक्व समाजभान जाणवते.

'सांगा मायबाप' मधील शहरातील मुलांचा संसार म्हणजे दुरून डोंगर साजरा असाच प्रकार आज आहे. म्हणून 'नको वेडी माया। आपुलं हे घर। टांगुनिया भार इथेच गा' असेच त्या मायबापाला म्हणायची पाळी का येते, हे कवयित्रीने अभंगसदृश्य रचनेत मांडले आहे. मुलगा-सून यांच्या कुत्र्याला ब्रेड मिळते, पण आईबापांना चहाही नाही. त्यांचे मूळ ऐसपैस गावकीत रुजल्याने शहरातील 'बंद दाराआड' त्यांचे मन कसे रमणार? 'गोल छिद्रात चौकोनी खुंटी बसत नाही' हेच खरे. आईला भेटायला जाण्याऐवजी आईच मुलाला भेटायला जाते. वडील आजारी पडल्यावर मुलगा उपचार म्हणून भेटायला येतो. पण वडील त्याची भेट नाकारून प्राण सोडतात. तेव्हा आई मुलाला सांगते, 'त्यांची इच्छा पूर्ण झाली.' यावरून दोन पिढ्यांचे अंतर ध्यानी यावे. 'अफवाही नाहीत या' या कवितेतून कुटुंबविघटनातून रक्ताची नाती कशी तटातट तुटतात हे अभिव्यक्त झाले आहे. आता घरातील भांड्याच्या खणखणाटाऐवजी तुटणा-या नात्याच्या वलयांचा आवाज कसा काळजाला भोकं पाडतो, हे नेमकेपणाने व्यक्त झाले आहे. याउलट, कुटुंबाचे विघटन होऊ नये म्हणून मरणा-या म्हाता-याकडून पाच भावांकडून एकोपा पाळून 'पाचुंदा' इस्कटू न देण्याचे वचन घेतले जाते, हेही नाती जपण्याचे समाजभानच म्हटले पाहिजे. येथे कवयित्रीचे प्रौढत्व जाणवते. मात्र 'दोन वाघ' या कवितेत भरल्या घरात वादळ सुटल्यावर सखखे भाऊ

पक्के वैरी होतात आणि 'वाघ बछडे विसरून। मागं मागं आली बायको' हे चित्र अपरिहार्यच आहे.

घरातला 'म्हातारा' आता मुले-सुना यांना नकोसा होतो. कधी न्हाणीतला साबण 'गायब' होतो तर कधी रात्रभर खोलीत 'अंधार' खेळतो आणि कळस म्हणजे सोकावलेल्या कावळ्याने कोंबडीची अंडी उचलून नेल्यावर म्हाता-यावर अंडी चोरून विकल्याचा आळ येतो. 'माणसे वाईट नसतात, म्हातारपण वाईट असते,' हेच खरे ! त्यामुळेच 'मढ्यांच्या चोचल्यापेक्षा। जित्यांना जपा म्हणत। कुणाच्याही मयतीत बरळतो म्हातारा' हे वास्तव समाजातील सत्यच तो सांगतो. 'मायलेक' कवितेत आई मुलीला सांगते, 'माझ्या घरातच पोरी। मी ग परकी झालेली। उघड्याच ओसरीत। तू बी आस-याला आली.' मुलगी सासरचा छळवाद टाळण्यासाठी माहेरी येते, तर आईला सून-मूल उघड्या ओसरीत ढकलतात. हाच नात्यांतील मूल्य-हास पाहून कवयित्री व्यथित होते. म्हणून ती अखेरीस म्हणते, 'तुझं काय, माझं काय। बाई जलमाचं कोडं' (पृ. ९५). यातून स्त्रीचे दुय्यम स्थानच अधोरेखित होते.

(६)

जागतिकीकरणाने आणि खाजगीकरणाने जगाला काबूत आणले आहे. भारतीय मनेही त्यामुळे हुरळून गेली. मोठमोठ्या मॉलमधील चकचकीत वस्तूंच्या आणि पुडक्यांच्या थप्प्या आणि जाहिरातबाजी यांमुळे आपणही हुरळून गेलो. पण यामधील फसवणुकीचे चित्र कुठे आपल्या लक्षात येते ? एका हाताने पैसे देऊन दुस-या हाताने योग्य वेळी न समजता काढून घेतले जातात आणि तरीही 'काळाबरोबर चालताना' आपले नाटकही रंगत चालले, हाच जागतिकीकरणाचा महिमा कवयित्री उपहासाने मांडते. दहा रुपयात मूठभर मॅगी घेताना बाजारभावाने भाकरीची किंमतच आपण काढण्यास विसरतो आणि त्याच वेगाने जागतिक बँकेतही पोचतो.

आज शहरीकरणामुळे ग्रामीण जीवन उद्‌ध्वस्त होत आहे. 'जमीन म्हंजी। घरातली जाळी नव्हती। लोंबली की झटकावी.' असा आकांत म्हातारी माणसे आजच्या पिढीला विचारत आहेत. कारण बापजाद्यांची इज्जत विकून मालकाचा रखवालदार बनल्याचे चित्र अस्वस्थ करणारे आहे. रासायनिक खतांचा बेसुमार वापर आणि जनावरांना नैसर्गिक वैरणीऐवजी प्लॅस्टिकच्या पिशवीतील पशुखाद्य देणे म्हणजे 'शेणाला माणसांच्या घाणीचा वास येणं.' हा कोणत्या दिशेने चाललेला प्रवास आहे, असा प्रश्न पडतो. ही आधुनिकतेकडे वाटचाल असली तरी ती निःसत्त्व आणि म्हणून व्यर्थ आहे, असे कवयित्रीस वाटते. निसर्ग हा मानवापेक्षा श्रेष्ठ असला तरी तो तितकाच निर्घृणही आहे. निसर्गरम्य डोंगर गावच्या गावं आपल्या कुशीत घेतो. म्हणून 'विचारपूर्वक खंजीर खुपसण्यात निसर्गाइतका माहीर कुणीच नाही', हे चिरंतन आणि वैश्विक सत्य कवयित्री सांगते. विशिष्ट विषय असा साधारणीकरणाच्या पातळीवर कलावंत आणतो, तेव्हा ती कलाकृती जीवनाचे वैश्विक सत्यही ताटस्थ्याने सांगून जाते.

आजचे राजकारणीही परिवर्तनाच्या नावाने शेतक-याला बेमालूम फसवितात. शेंडा-बुडखाही माहीत नसणारे शेतक-यांचा पुळका आणून 'गाजराच्या पुंगीवर डुलवतात। परिवर्तनाच्या नावानं' ही आजची आधुनिक मूल्यहीनता कवितेचा विषय होते. वस्तिशाळेचे नाव 'ऑक्सफर्ड' ठेवलं म्हणजे कणी सुधारणांचे अग्रदूत होत नाही. ही समाजाची फसवणूकच आहे. 'उठता बसता। समाजाची सेवा। साराच देखावा। बिनकामी' अशा 'ढोंगी प्रवृत्तीचा दिवा विझो,' अशी रागाची भावना या मूल्यहीनतेमुळेच व्यक्त होते. पूर्वी एका हाकेत गाव गोळा होत होते, ते चित्र मात्र आता बदलत चालले आहे. गावजत्रा गेल्या. आता तेथे पिस्तुलाच्या गोळ्यांची भीती वाटते. 'इस्टेटीच्या दाव्यापेक्षा माहेरची माया' लेकीबाळींना महत्त्वाची होती. आता भावाच्या इस्टेटीत वाटा मिळण्यासाठी नाती तुटत चालली. आजची शिक्षण--व्यवस्थाही कवयित्रीला अस्वस्थ करते. मोठमोठ्या बॅगांत बोचकी कोंबून कोवळ्या पाठीवर ओझी लादून कोवळी मने हिरमुसतात. 'कुठे पळतोय हा काळ। गावशिव गुंडाळून' हा कवयित्रीचा प्रश्न अनाठायी नाही. एकंदर समाजाचे हे बदलते चित्र समाजजीवन संकुचित करणारे आहे, हेच खरे.

'पायरीवर डोकं टेकल्या टेकल्या' या कवितेतून श्री विठोबाला कवयित्रीने काही उपहासात्मक प्रश्न








विचारून समाजातील व्यंगे दर्शविली आहेत. कष्टकरी स्त्रिया वीटा थापतात तेव्हा त्यांची करुणा तुला येते का? फूटपाथवर चिरडलेल्याच्या घरीही चिरडणा-यांनाच पाठिंबा दिला जाणे, मुलाने केलेली आत्महत्या म्हणजे जन्मदात्याने खून केल्याचा गुन्हा ठरविणे म्हणजे मायेचा हात होरपळण्यासारखेच असते ना? म्हातारा-म्हातारीला मुलांनी वेगळे ठेवून त्यांना दोन्ही घरांतून मिळालेल्या वाट्या भिरकावून दिल्यावर उपाशी झोपणा-या त्या जीवांना विठ्ठल कसा समजावणार? महापुरात गाव बुडाल्यावर विठ्ठल केवळ मास्तराची भूमिका निभावणार का? असे काही सामाजिक प्रश्न विचारून कवयित्रीने समाजातील वैगुण्यांकडे अंगुलिनिर्देश केला आहे. राजकारण्यांचा भयानक दबाव आणि समाजातील मूल्य-हास यांमुळेही माणूस 'दावं' देऊन पलायनवादी झाला आहे. 'मेंदूत भडकलेल्या वादळात। रात्रंदिवस भान हरपून। चालता चालता पळतो काय। पळता पळता चालतो काय' (पृ. १०९) अशी आज माणसाची एकूण मूल्यहीन अवस्थेकडे वाटचाल सुरू आहे, असा या एकूण कवितेचा अर्थव्यूह आहे.

कवयित्रीने 'लपण्याजोगं राहिलं नाही' या कवितेत काही स्वतंत्र तुकड्यांतून काही चिंतनशील विचार मांडले आहेत. त्या तुकड्यांतून मातीची ओढ, शेतकरीव्यथा, समाजसन्मुखता, मानवी स्वभावातील वैचित्रे, समानधर्मी शोधून त्यात रमणे, संघर्ष आणि सौजन्य यांचे मूल्य, माणसाचे संकुचितपण, शिक्षणाचे बाजारू स्वरूप, विज्ञान आणि संस्कृती असमन्वयक, आरोग्यक्षेत्रातील नैतिक -हास, मुले विकत घेऊन आईपण उपभोगणे, उथळ संशोधनावर हल्ला यांसारखे काही ज्वलंत प्रश्न कवयित्रीने उभे केले आहेत. ते प्रश्न आता लपून राहिले नाहीत. पण त्यामुळे समाज रसातळाला जातो की काय, ही चिंता कवयित्रीला व्यथित करते. म्हणून कवयित्री समाजपुरुषाकडे पसायदान मागताना म्हणते,

'झाडांच्या मुळांची।
मुळांच्या कुळांची।
शपथ असो दर उगवत्या कुडीला।
दुर्दम्य इच्छाशक्तीचं वरदान लाभो।
धडपड निरर्थक वाटणा-या प्रत्येकाला।
गोष्टीतल्या गोष्टी टिकून राहोत।
भल्या प्रार्थनांचे टट्ट होवोत'(पृ. ११८)

यातून निसर्गाची सृजनशीलता, मानवाचे कर्तृत्त्व, संस्कृतीची जोपासना आणि मानवी कल्याणाची प्रार्थना असे अनेक अर्थ सूचित होतात. यातून कवयित्रीची विश्ववात्सल्याची उदात्त भावनाही व्यंग्यार्थाने स्पष्ट होते.

**(७)**

या कवितेची भाषा विचारव्यूहांना गती देण्याइतकी तरल आहे. बरीचशी कविता विचारप्रधान आणि चिंतनाच्या पातळीवर जाणारी आहे. दोन कविता प्रासादिक अभंगाच्या रूपात आहेत आणि 'लपण्याजोगं राहिलं नाही' या मुक्तचिंतनात काही विचारांप्रमाणे काही सुटे तुकडे आहेत. बरीचशी कविता मुक्तछंदसदृश असली, तरी लयबद्ध मुक्तछंदाचा येथे अभाव आहे. मात्र कवितेला स्वतःचा अंतःस्वर, अंतर्गत लय आहे. त्यामुळे ती वाचनीयच अधिक आहे. मुक्तशैली आणि चित्रदर्शी शैलीमुळे कवितेची अर्थवाहकता आणि दृश्यात्मकता लक्षवेधी आहे.

कवयित्री समाजात डोळसपणे वावरते. त्यामुळे लोकसंकेत, पौराणिक मिथके, लोकबंध यांची योजना ती सहजपणे करते. उदा., मारुतीला आवडणारा रुईच्या पानांचा हार, सौंदडचे देवकातील स्थान, पांडवांची शस्त्रे ठेवण्याची जागा, सवाष्णीच्या पदरात उगवण म्हणजे तांदूळांऐवजी गहू घालणे, रास मोजताना टोपी घालणे हा शुभसंकेत, शिमग्याच्या बोंबा, पखालीचं पाणी, साधू वाण्याची बुडकी नौका, गावशिवेवरील पांडवांची पूजा, वारक-यांचे आराध्यदैवत विठोबा, भीमबेटकाची चित्रे--शिल्पे इत्यादी मिथकांमुळे कवितेला एक सामाजिक--पौराणिक असा आधार मिळून कविता अर्थबहुल झाली आहे. कवयित्रीच्या बहुश्रुततेचा हा प्रभाव जाणवतो.

कवयित्री शेतीमातीत प्रत्यक्ष राबत असल्याने शेतीशी निगडित प्रतिमा स्वाभाविकपणे योजल्या गेल्या आहेत. उदा., झाडांभोवतीचं आळं, होरपळणारे वास्तव, भूमीशी बांधलेलं आयुष्य, मुरमात खुरपं घुसल्यागत, खरबुडीत बुंधा, पंखावरचे रंगीत डोळे, जाई-जुईची बेटाडं, भावकीचं कार्य, विरळ पेरणी, सपताळ रक्तपेरणी, चिवट पाथ, बागाईत झुडपं, मातीचं गणगोत, चंदनाची बाहुली,








शेवग्यासंगे हसणे, कुजके एरंड इत्यादी रंगरूपाच्या विविध प्रतिमांनी काव्याशयाला शब्दसंवेदना आणि स्पर्शसंवेदना प्राप्त होऊन काव्याशय समृद्ध झाला आहे. याचे कारण 'मूळ ओल अंतरिची' असल्याने 'साच' अनुभव प्रकटले आहेत. संत तुकोबांच्या 'अंतरिचे धावे स्वभावे बाहेरी'चा हा प्रभाव असावा.

कवयित्रीचे दैनंदिन जीवन ग्रामीण भागात व्यतीत होत असल्याने त्या परिसरातील बोलीभाषेचे संस्कार अपरिहार्य आहेत. त्यांचाही वापर कवयित्रीने आशय-समृद्धीसाठी सहजपणे केलेला आहे. उदा., अख्खा, टोकरत, तोडकरी, तरवे, मुस्काडतोंडी, भुंडे, बेटाडं, बरकत, विटळावी, टोभावी, मूस, जार, फुफाटा, तखड, धान, तण, वारून, मुसकी, भराका, गावकी, आटोळया, बारे, चगळ, पाणथळ, क्षारपड, भुस्कट, चिटावं, वावर, चिनपाट, धग, दळींदर, तळवट, मिसळतेत, दिसतेत, बक्कन, भुई खुरंदाळणे, सुरू-खोडवा, खोलख्यात इत्यादी शब्दांत नामे, विशेषणे, क्रियापदांचा समावेश आहे. त्यामुळे कवितेच्या आशयाला अस्सल रूप प्राप्त झाले. कवितेची भाषा गतिमान असल्याचाही येथे प्रत्यय येतो. कमीत कमी पण अर्थपूर्ण बोलीतील शब्दांनी या कवितांचा आशय संवेदनांच्या पातळीवर आपोआप पोचतो. कवयित्रीच्या शैलीचे हे यश म्हणता येईल. मुखपृष्ठावर शेतात जाणारी कामसू स्त्री गाय-वासराला घेऊन जाताना दाखविली असून गाय मातृवात्सल्याने वासराला प्रेमाने चाटते आहे. सुप्रसिद्ध चित्रकार रामकिंकर बैज यांचे हे अर्थपूर्ण चित्र असून सुधाकर यादव यांच्या सौजन्याने ते प्राप्त झाल्याचे ऋण नमूद केले आहे. गाय ही शेतक-यांच्या दृष्टीने कामधेनू आहे. शेतकरी आणि गाईचे कौटुंबिक नाते आहे, हेच यातून स्पष्ट होते. या मुखपृष्ठावरून कवितांतील आशयाचा सहज अंदाज येतो. समाजजीवनातील विविध विषयांना स्पर्श करणारा वैचारिक कवितासंग्रह वाचकांना दिल्याबद्दल कल्पना दुधाळ यांचे अभिनंदन आणि पुढे अशाच सत्त्वशील कवितांची अपेक्षा.

धग असतेच आसपास
(कवितासंग्रह) कल्पना दुधाळ
प्रकाशक - लोकवाङ्मय गृह, मुंबई
पहिली आवृत्ती - एप्रिल २०१६.
पृष्ठे - १२०, किंमत रु. १५०/-

✷✷✷

## पुस्तक परीक्षण

# युगवाणीचे तीन संपादक

राजेंद्र गणेश डोळके

संपादन हा कायम चर्चेत रहाणारा विषय असून फार व्यापक आहे. तसाच तो फार जुना आहे. एकनाथांनी ज्ञानेश्वरी 'शुद्ध' केली म्हणजे त्याचे संपादनच केले. अलीकडे इ.स. २०११ मध्ये पीटर एल. शिलिंग्जबर्ग या पाश्चात्त्य लेखकाने संपादन या विषयावर 'फ्रॉम गटेन्बर्ग टू गुगल' त्या नावाचा एखाद्या डॉक्टरेटच्या प्रबंधाला शोभेल असा ग्रंथच लिहिला आहे.

संपादन ही एक कला आहे. कला म्हटल्याबरोबर साहजिकच त्याचा संबंध सौंदर्याशी येतो. लेखक स्वतःच्याच लेखाचे अनेक वेळा संपादन करतो. म्हणजेच स्वतःचे लेखन आकर्षक, रेखीव आणि सुंदर कसे होईल, याची काळजी घेत असतो. दुस-याच्या लिखाणाचे संपादन करणे तर आणखी कठीण. कारण या ठिकाणी त्याला दुस-याचे लिखाण आटोपशीर तर करायचे असते, परंतु लेखातील आत्म्याला धक्का लावायचा नसतो.

संपादकाची मुख्य कामे दोन. पहिले, उत्तमोत्तम साहित्य मिळविणे आणि दुसरे म्हणजे ते लेखकाच्या विचारांना ढळ न पोचविता नीटनेटक्या स्वरूपात वाचकांपुढे मांडावयाचे. याकरिता संपादक हा सुजाण व साक्षेपी हवा. वाङ्मयातील विविध क्षेत्रांतील चौफेर माहिती त्याला हवी. ज्ञान आणि कला यांचा संगम त्याच्या ठिकाणी झालेला हवा. यावरून संपादन म्हणजे ये-यागबाळ्याचे काम नव्हे, हे आपल्या लक्षात येते.

आपल्याकडील नियतकालिकांचे संपादन हे आणखी कठीण, जबाबदारीचे आणि वादग्रस्त क्षेत्र आहे. संपादक कोण असावा इथूनच काही मंडळी वाद सुरू करतात. इ.स. १९४७ मध्ये 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चे संपादक म्हणून कविवर्य यशवंतांची नियुक्ती झाली होती. यशवंत हे केवळ एक 'भावकवी' असल्याने 'पत्रिकें'च्या संपादकासारख्या गंभीर पदावर ते रहाण्यायोग्य नाहीत असा सूर काही मंडळींनी लावला होता. त्याचा परिणाम यशवंतांनी हे पद सोडून देण्याची पाळी येईपर्यंत झाला होता.

अशा या कठीण व त्याचबरोबर नाजूक विषयाला डॉ. विलास चिंतामण देशपांडे यांनी हात घातला आहे. याकरिता त्यांनी 'युगवाणीं'च्या तीन संपादकांची निवड केली आहे. 'युगवाणी' हे 'विदर्भ साहित्य संघा'चे मुखपत्र असलेले नियतकालिक इ. स. १९४६ पासून सुरू झाले. जानेवारी १९४६ मध्ये याचा पहिला अंक निघाला. तेव्हापासून आजपर्यंत ७० वर्षांच्या कारकिर्दीत युगवाणीला एकूण २५ संपादक लाभले. या ७० वर्षांच्या प्रवासात श्री. वा. ना. देशपांडे, श्री. माणिक गोडघाटे (ग्रेस) व डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी हे तीनच संपादक आपले प्रवासीपण वाचकांच्या कायम स्मरणात ठेवून गेले. या तीन संपादकांशिवाय इतर कोणत्याही संपादकाने आपल्या संपादनकौशल्याची स्वतंत्र अशी मुद्रा ठसठशीतपणे उमटवलेली दिसत नाही, असे डॉ. देशपांडे यांचे म्हणणे आहे. (पृ. ९) या तीन संपादकांच्या संपादकीय कारकिर्दीवर प्रकाशझोत टाकण्याकरिता व त्यांच्या संपादनाचे वैशिष्ट्य सांगण्याकरिता डॉ. देशपांडे यांनी हा ग्रंथ लिहिला आहे.

वा. ना. देशपांडे हे युगवाणीचे आद्यसंपादक. युगवाणीचा पहिला - जानेवारी १९४६ चा - अंक त्यांच्या संपाकत्वाखाली निघाला. नियतकालिकाचे 'युगवाणी' हे नावही त्यांनीच ठेवले. त्यांच्या संपाकत्वाखालील शेवटला अंक फेब्रुवारी १९४९ मध्ये निघाला. ह्या तीन वर्षांतील त्यांच्या संपादकीय वैशिष्ट्यांचा व त्यांच्या कारकिर्दीत प्रकाशित झालेल्या ठळक वाङ्मयाचा आढावा डॉ. देशपांडे यांनी घेतला आहे. असा आढावा घेण्याचा यापूर्वीही प्रयत्न झालेला आहे. 'युगवाणीचे आद्य संपादक : वा. ना. देशपांडे' या शीर्षकाने डॉ. गोविंद देशपांडे यांनी युगवाणीच्याच जुलै १९९१ च्या अंकात याच विषयावर एक लेख लिहिला आहे. परंतु नियतकालिकाच्या पृष्ठमर्यादेमुळे हे विवेचन थोडक्यात झाले आहे. त्यामुळे या विषयावर दीर्घ विवेचनाची आवश्यकता होती. देशपांडे

अनुक्रमणिका

यांच्या अशा विवेचनामुळे वाचकांची सोय झाली आहे.

वा. ना. देशपांडे यांची संपादकीय कारकिर्द विशेषत्वाने उठून दिसते. संपादक कसा असावा, त्याच्या ठिकाणी कोणते गुण आवश्यक असावेत, वाङ्मयीन नियतकालिकाचे स्वरूप कसे असावे वगैरे गोष्टींबद्दल वा. नां. च्या मनात निश्चित बैठक होती आणि त्यानुसार त्यांनी आपले संपादनाचे धोरण ठरविले. ते धोरण वेळोवेळी त्यांनी आपल्या 'संपादकीयां'तून लोकांसमोर मांडले आणि ते साकारण्याकरिता त्यांनी त्यात्या विषयावर मुद्दाम लेख मागवून घेतले. कविता, काव्यविचार, साहित्यिकांची वा साहित्यिकांचा संबंध असलेली पत्रे, भाषांतरित साहित्य, स्त्रीसाहित्य, संशोधन, प्रबंधात्मक लेखन, साहित्यसमीक्षा, पत्रव्यवहार इत्यादी साहित्यप्रांतातील चौफेर घटकांना आपल्या कारकिर्दीत युगवाणीत स्थान दिले. एवढेच नव्हे, तर त्यांनी काही व्यक्तींवर 'विशेषांक'देखील काढले.

वा. ना. देशपांडेंनंतर सुमारे २२ वर्षांनंतर युगवाणीचे संपादकपद श्री. माणिक गोडघाटे उर्फ ग्रेस यांच्याकडे आले. मे-जून १९७१ ते फेब्रु-मार्च १९७४ हा साधारणतः तीन वर्षांचा कालखंड त्यांचा होता. त्यांच्या कालखंडाबद्दल डॉ. देशपांडे म्हणतात, "प्रा. माणिक गोडघाटेंपासून युगवाणीचे स्वरूप पूर्णपणे बदलून गेले. तोपर्यंत युगवाणीच्या अंगोपांगांत तोचतोपणा होता. तत्कालीन वाचकांची गरज कमालीच्या अचूकपणे हेरण्याचे गोडघाटे त्यांचे कसब आणि वाङ्मयीन जाण आपल्या मनाला एकदम भावून जाते. गोडघाटेंनी युगवाणीच्या स्वरूपात आमूलाग्र बदल केला."

गोडघाटेंनी अग्रक्रम दिलेल्या विषयांत सामाजिक, धार्मिक, नाट्य इ. प्रकारांना विशेष स्थान देण्यात आले असले, तरी कविता या प्रांतावर त्यांचे विशेष प्रेम असल्यामुळे आणि मुळात ते कविमनाचे कलावंत असल्यामुळे त्यांनी केलेली कविताविषयांची निवड हे या काळातील युगवाणीचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य ठरते, असे देशपांडे म्हणतात. गोडघाटे यांच्या काळातील इतर वाङ्मयीन नियतकालिकांचे स्वरूप व त्या काळातील प्रतिष्ठित लेखकांची यादी देऊन या सर्वांचा विचार गोडघाटे यांनी आपले संपादन साकारताना केला, असे डॉ. देशपांडे यांचे म्हणणे आहे. 'वाङ्मयीन नियतकालिकांच्या इतिहासात ज्या ज्या संपादकांनी आपल्या संपादकीय कारकिर्दीचा विलक्षण ठसा उमटविलेला आहे, त्या संपादकांच्या यादीत युगवाणीचे संपादक प्रा. माणिक गोडघाटे ह्यांचे नाव वरच्या क्रमांकावर ठेवावे लागते', असे ते म्हणतात. (पृ. ८७)

गोडघाटे यांच्यानंतर देशपांडे श्री. श्रीपाद भालचंद्र जोशी यांच्याकडे वळले आहेत. युगवाणीच्या ७१ वर्षांच्या इतिहासात सर्वाधिक काळ म्हणजे सलग ९ वर्षे संपादकपदी राहण्याचा मान लाभलेले ते एकमेव संपादक होत. (पृ. ९२) १९८६ ते १९९५ हा त्यांचा कार्यकाल. जोशींची संपादकपदाची कारकीर्द ही जशी दीर्घ आहे, तसेच त्यांच्या संपादनकारकिर्दीची ओळख करून देण्याकरिता वाहिलेल्या देशपांडे यांच्या ग्रंथांच्या पृष्ठांची संख्याही दीर्घ आहे. ५२ पृष्ठे ही कारकीर्द सांगण्याकरिता खर्ची पडली आहेत. ह्यात सुरुवातीची साडेतीन पाने तर डॉ. जोशींचा बायोडाटा देण्यातच खर्च झाली आहेत. पुढेही विवेचनाच्या ओघात कुठेकुठे त्यांच्या कार्याची, लिखाणाची व भूषविलेल्या पदांची माहिती देण्यात आली आहे. जोशी यांचा हा बायोडाटा व माहिती वाचून वाचकावर थक्क व्हायची पाळी येते. जोशी काय नाहीत आणि कशात नाहीत हेच शोधणे म्हणजे एक दुर्घट काम आहे, असे वाटायला लागते. अशा या सर्वगुणसंपन्न व्यक्तीची संपादकीय कारकीर्द वैशिष्ट्यपूर्ण न ठरली तरच नवल. म्हणूनच त्यांच्या या प्रचंड कार्याच्या पार्श्वभूमीवर 'युगवाणीच्या संपादनाची स्वतंत्र व संपूर्ण जबाबदारी विदर्भ साहित्य संघाने जी त्यांच्यावर टाकली, ती श्रीपाद भालचंद्र जोशी त्यांनी समर्थपणे पेलली', असे डॉ. देशपांडे म्हणतात. (पृ. ९५) पुढे डॉ. जोशी यांच्या संपादनाची वैशिष्ट्ये, त्यांच्या कार्यकाळात प्रकाशित झालेल्या लेखांची यादी व त्यांनी अंतर्भूत केलेले नवीन विषय, निरनिराळ्या संमेलनांचा वृत्तांत वगैरे विषयांना आपल्या कार्यकालात स्थान दिले हे सांगून 'त्यामुळे जोशींच्या संपादनाचा काळ वेगळा ठरतो', असे देशपांडे सांगतात. श्री. जोशींचे विशेष वैशिष्ट्य हे की, त्यांनी भाषाशास्त्रासारख्या यापूर्वीच्या युगवाणीच्या संपादकांनी दुर्लक्षिलेल्या महत्त्वाच्या विषयासही मोठ्या प्रमाणावर

जागा दिली. जोशींच्या सक्रीयतेचा व उत्साहाचा पुरावा म्हणून त्यांनी आयोजित केलेल्या 'युगवाणीचे आद्यसंपादक कै. वा. ना. देशपांडे स्मृती वाङ्मयीन नियतकालिक विकास परिषदे' च्या आयोजनाकडे अंगुलिनिर्देश करता येईल.

जोशींनी युगवाणीला लिहिलेली दीर्घ संपादकीये हा एक स्वतंत्र विषय आहे. ह्या संपादकीयांची इतकी पृष्ठे झाली की, त्याचे त्यांना एक पुस्तकच काढावे लागले. स्वतःच्या कार्यकालात त्यांनी युगवाणीतून लिखाणही बरेच केले आहे. डॉ. देशपांडे यांनी संपादकांचे एक वर्गीकरण पृ. ९१ वर सादर केले आहे. ते लिहितात, "संपादकाचे दोन प्रकारांत वर्गीकरण केले जाते. लिहिणारे संपादक आणि न लिहिणारे संपादक. गोडघाटे हे कमी लिहिणारे संपादक ही संपादकांची तिसरी श्रेणी त्यांनी निर्माण केली." श्रीपाद जोशींच्या निमित्ताने या ठिकाणी असे म्हणावेसे वाटते की, 'जास्त लिहिणारे संपादक' ही चौथी श्रेणी जोशींनी निर्माण केली.

युगवाणीच्या या तीनही संपादकांची वैशिष्ट्ये सांगणा-या डॉ. देशपांडे यांच्या या ग्रंथाचे स्वरूप याप्रमाणे आहे. देशपांडे यांनी केवळ संकलनात्मक दृष्टिकोणातूनच हे लिखाण केलेले नाही, तर वेळोवेळी आपली मतेही निर्भीडपणे प्रदर्शित केली आहेत. तसेच या तीनही संपादकांच्या काळची आर्थिक व सामाजिक परिस्थितीही चित्रित केली आहे. यामुळे ग्रंथात जिवंतपणा आला आहे. अर्थात मते आली म्हणजे मतभेदही आलेत. या मतभेदांच्या जागा ग्रंथात पुष्कळच राहू शकतात. येथे एक-दोन मतभेद प्रदर्शित करतो.

ग्रेसच्या संपादकत्वाविषयी डॉ. देशपांडेंचे उद्‌गार वर दिलेच आहेत. ग्रेस यांनी स्वतःच्या प्रकृतिधर्मानुसार युगवाणीचे संपादन केले. 'त्यांनी केलेल्या युगवाणींच्या संपादनावर त्यांच्यात वसत असलेल्या कलावंताने मात केली', असे देशपांडे म्हणतात. (पृ. ८८) असतील कदाचित ग्रेस फार मोठे कलावंत! पण अशा कलावंताची युगवाणीच्या संपादकपदी काय आवश्यकता? एका वाङ्‌मयसंस्थेचे 'साहित्यिक' मुखपत्र असलेल्या नियतकालिकाच्या संपादकपदी बसण्याचे सामर्थ्य असले म्हणजे झाले. काहीतरी विचित्रपणा केला म्हणून त्याला इतर संपादकांपेक्षा 'वेगळे' आणि 'श्रेष्ठ' ठरवायचे याला काय अर्थ आहे? डॉ. देशपांडे यांनी युगवाणीकरिता ग्रेसनी मागविलेल्या टिपणांची यादी दिली आहे. त्यांतील काही टिपणांचे शीर्षक वाचून तर मती गुंग होऊन जाते. उदा. (१) डॉ. झिवॅगो (बोलपट) मधील बर्फाची प्रतीक-शक्ती, (२) चांद उस्मानी, (३) कॅन्सर वार्ड, (४) जेम्स मॅसनचा आवाज, (नट), (५) अनमोल घर्डीतील नूरजहांची गाणी, (६) 'कोशिश' मधील पार्श्वसंगीत, (७) भडक रंगाच्या फुलांची झाडे वगैरे.

आहेत की नाही संभ्रमात टाकणारे विषय? 'साहित्यिक' नियतकालिकाशी याचा काय संबंध? विषय सुंदरही असतील व 'कलावंत' ग्रेसच्या डोक्यातून निघाले असतील. पण त्यांची जागा ही नव्हे. दुसरी आहे. ग्रेसच्या अशा प्रकारच्या धोरणामुळेच त्यांची करकिर्द वादग्रस्त ठरली असावी व त्याबद्दल उलटसुलट प्रतिक्रिया व्यक्त करण्यात आल्या असाव्या. या दृष्टीने ग्रंथातील पृ. ८७ ते ९१ वरील मजकूर बराच उद्‌बोधक वाटावा.

डॉ. जोशीही उत्तम कलादृष्टीचे आहेत, साहित्यिक आहेत. त्यांच्या संपादनातही कलावंत डोकावतो. पण त्यांनी ग्रेससारखा अतिरेक केला नाही. तर वा. ना. देशपांडे आणि ग्रेस यांनी उत्तम रीतीने समन्वय साधण्याचा प्रयत्न केला. जोशींनी युगवाणी ग्रेसपेक्षा अधिक 'साहित्या'भिमुख केले, असे निश्चितपणे म्हणता येते.

ग्रेसबद्दल लिहिताना डॉ. देशपांडे म्हणतात, 'युगवाणी हे वा. ना. देशपांडे यांच्या कालखंडानंतर अखिल मराठीचे प्रातिनिधिक नियतकालिक म्हणून तिने प्राप्त केलेले जे स्थान हरवून बसली होती ते माणिक गोडघाटे ह्यांच्या संपादनकाळाने युगवाणीला पुनः प्राप्त करून दिले.' (पृ. ५०) जोशींबद्दल डॉ. देशपांडे लिहितात, "जोशीपूर्व युगवाणीच्या २३ संपादकांच्या संपादकीय कालखंडापेक्षा जोशींचा संपादनाचा काळ म्हणूनच वेगळा ठरतो" (पृ. ९७).

डॉ. देशपांडे यांची या दोघांबद्दलची विधाने वाचून मी युगवाणीच्या काही संपादकांची नावे डोळ्यांसमोर आणण्याचा प्रयत्न केला, तर चटकन काही नावे माझ्या डोळ्यांसमोर आली. वा. कृ. चोरघडे, श्री. मा. कुलकर्णी,

वसंत व-हाडपांडे, या. मु. पाठक, आशा सावदेकर इ. या संपादकांजवळ संपादकीय दृष्टी नव्हती का? ही मंडळी निश्चितच नामवंत होती व मराठी साहित्यावर मनापासून प्रेम करणारी होती. युगवाणी दर्जेदार करण्याकरिता सरळ मार्गाचा अवलंब करून त्यांनीही आपापल्या परींने प्रामाणिक प्रयत्न केले. आपले संपादकत्व 'वेगळे' ठरविण्यासाठी काहीतरी वेडेवाकडे करण्याची त्यांची वृत्ती नव्हती. यांच्याही काळात युगवाणी दर्जेदार निघाली आहे आणि अनेक महत्त्वाचे ठरलेले लेखक उदयास आलेले आहेत.

या सर्व विवेचनावरून एकच सत्य निष्कर्ष हाती येतो. तो म्हणजे वा. ना. देशपांडे यांनी युगवाणीच्या सुरुवातीलाच जी ध्येयधोरणे आखली, जे युगवाणीचे स्वरूप स्पष्ट केले आणि ज्या प्रकारे 'एका साहित्यसंस्थेचे वाङ्मयीन मुखपत्र' वाचकांसमोर सादर केले, त्यात फारशी वेगळी भर कुणालाही टाकता आलेली नाही. काही विचित्र व अनावश्यक अंगे सोडली, तर वा. ना. देशपांडे यांनी सुरुवातीपासूनच साहित्यविषयक सर्व अंगांचा अंतर्भाव आपल्या संपादनात केलेला दिसतो. म्हणून युगवाणीचा आदर्श संपादक कोण असे विचारले, तर त्याचे उत्तर एकच– वा. ना. देशपांडे पहिले व अजूनपर्यंत शेवटचेही!

असो. डॉ. देशपांडे यांनी एका वेगळ्या विषयावर हे पुस्तक लिहिले आहे. त्याची उपयुक्तता निश्चितच मोठी आहे. या तीनही संपादकांच्या कारकिर्दीतील वाचकाला आवश्यक असलेला लेख कोणत्या अंकात आला आहे, हे एखाद्या सूचीप्रमाणे कळून येण्यासारखी सोय वाचकाची झाली आहे. तसेच या तिघाही संपादकांनी आपल्या कार्यकाळात प्रकाशित केलेले साहित्य हे एकूणच मराठी साहित्यव्यवहाराला कसे पोषक ठरले आहे, हेही कळण्याला मदत झाली आहे. त्यासाठी डॉ. देशपांडे यांनी भरपूर वाचन व युगवाणीचे अनेक अंक दृष्टीखालून घातल्याचे लक्षात येते. त्यांच्या आगामी ग्रंथात 'युगवाणीचे काही संपादक' या ग्रंथाचा उल्लेख आढळून येतो. माझे तर असे म्हणणे आहे की, 'युगवाणीचे सर्व संपादक' या नावाचा प्रकल्प हाती घेऊन त्यावर त्यांनी एक बृहन्ग्रंथ लिहावा. त्यासाठी त्यांना आत्ताच शुभेच्छा देऊन हे लांबलेले परीक्षण संपवितो.

युगवाणीचे तीन संपादक -
डॉ. विलास चिंतामण देशपांडे,
लाखे प्रकाशन,
नागपूर - ४४० ०३२.
पृ. १४४ मूल्य-२००/-

✷✷✷

**पुस्तक परीक्षण**

# 'स्वातंत्र्यवीर सावरकरांचे रत्नागिरीतील सामाजिक कार्य'

सु. र. देशपांडे

प्रस्तुत पुस्तकाला डॉ. अशोक मोडक यांची प्रस्तावना असून पुस्तकाची एकूण दहा प्रकरणे (पृष्ठे ७८) आहेत. त्यांतील उपसंहार हे दहावे मूल्यमापन करणारे प्रकरण सर्वांत मोठे (११ पृष्ठे) असून नऊ परिशिष्टे व संदर्भसूची अखेरीस दिली आहे.

'स्वातंत्र्यवीर सावकरांचे रत्नागिरीतील सामाजिक कार्य' या शीर्षकार्थाचा डॉ. रमेश कांबळे यांचा हा शोधप्रकल्प पुस्तकरूपात प्रसिद्ध झाला आहे. या पुस्तकात इ. स. १९२४ मध्ये सावरकरांच्या रत्नागिरीतील स्थान-बद्धतेची सुरुवात झाली आणि सावरकरांनी इ. स. १९३७ पर्यंतच्या तेरा-साडे तेरा वर्षांमध्ये (६ जानेवारी १९२४ ते १७ जून १९३७) रत्नागिरी जिल्ह्यामध्ये ज्या सुधारणा व प्रबोधन केले; पतितपावन मंदिर रत्नागिरीमध्ये उभे केले, तसेच अस्पृश्यता, जातीयता नष्ट करण्यासाठी स्वतःची प्रतिष्ठा, विद्वत्ता, स्वतःचे महत्तम व्यक्तिमत्त्व बाजूला ठेवून दलितांना आपल्याबरोबर घेऊन मुद्दाम सवर्ण घरांचे उंबरठे झिजविले, याचे हे साक्षेपी निवेदन या पुस्तकात आहे. राजकारणविरहित केलेले हे समाजकार्य राजकीय कार्यापेक्षाही महान आहे आणि सामाजिक इतिहासाच्या दृष्टीने चिरस्थायी व लक्षणीय आहे. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या स्थानबद्धतेतील या कार्याचा परिचय डॉ. रमेश कांबळे यांनी तत्कालीन वृत्तपत्रे, विशेषतः 'बलवंत' आणि 'सत्यशोधक', साप्ताहिके, पत्रव्यवहार आणि सावरकरांवरील चरित्रग्रंथ यांचा धांडोळा घेऊन करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यातून सावरकरांच्या असामान्य नेतृत्वाचे दर्शन तर होतेच; पण त्यांची वैज्ञानिक दृष्टी आणि भाषा–प्रभुत्व यांची प्रचिती येते.

'राज्यक्रांतीकडून समाजक्रांतीकडे' या पहिल्या प्रकरणात रत्नागिरीला प्लेगचा प्रादुर्भाव झाल्यामुळे सावरकर जवळच्या शिरगांव या खेड्यात राहण्यास गेले होते. तेथील हनुमान जयंतीच्या उत्सवात जी दिंडी निघाली, त्यात सावरकरांनी 'हिंदूंचे एकता गीत' झाल्यावर व्याख्यान दिले आणि विलग पडलेल्या अस्पृश्य बांधवांना आपल्याबरोबर घेऊन दिंडी काढली. समाजाला धक्के देत राहणे, हा त्यांचा स्वभावविशेष होता. त्यांनी हनुमान जयंतीच्या उत्सवानंतर पहिल्या संमिश्र हळदी-कुंकवाचा प्रयोग केला. सवर्ण आणि त्यातही ब्राह्मणाच्या घरी अस्पृश्य स्त्रियांना हळदी-कुंकवाला बोलवावयाचे व सवर्ण महिलांनी स्वहस्ते त्यांना हळदी-कुंकू देऊन त्यांची ओटी भरावयाची, असा हा बेत होता. साहजिकच त्या काळात (१९२४-२५) घरातील स्त्रियांना ही गोष्ट कबूल नव्हती, मग अन्य स्पृश्य स्त्रियांची ती काय गोष्ट! अस्पृश्य स्त्रियांना निमंत्रण देण्यास कुणीही राजी नव्हते. सावकरकरांनी घरांतील स्त्रियांशी तडजोड केली. 'तुम्ही फक्त अस्पृश्य भगिनींना निमंत्रण द्यावे. या निमंत्रणाला मान देऊन ज्या भगिनी आपल्या घरी येतील, त्यांच्या ओट्या भरणे, त्यांना हळदी-कुंकू लावणे हे कार्य माई (सावरकरांच्या पत्नी) करतील.' या तडजोडीप्रमाणे शिरगांवातच काय पण सर्व जिल्हाभर कित्येक महिने या हळदी-कुंकवाच्या समारंभाची चर्चा चालू होती. अस्पृश्यांना स्पर्श करून त्यांच्या ओट्या भरणारी ही बाई आहे तरी कोण, हे पाहण्यासाठी स्त्रियांची खूप गर्दी त्यांच्याकडे झाली होती. या संदर्भातील डॉ. कांबळेंचा समयसूचक अभिप्राय बोलका आहे. "शिरगांवच्या या लहानशा हळदी-कुंकवानेच प्रथमतः रत्नागिरी जिल्ह्यातील सवर्ण हिंदूंना अस्पृश्यतेच्या रूढीविषयी चिकित्सापूर्ण दृष्टीने विचार करणे भाग पडले."

दुस-या प्रकरणात रत्नागिरीतील एक व्यायामशाळा सुरू करविली आणि अन्य संघटनांना व्यायामशाळा सुरू करण्यास प्रवृत्त केले वगैरे माहिती असून मुख्यत्वे अय्यर-सावरकर भेट याविषयीचे तपशील यात आढळतात. अय्यर हे त्यांचे लंडनमधील निकटवर्ती सहकारी व मद्रासचे सुप्रसिद्ध क्रांतिकारक होते. याच प्रकरणात










सावरकरांचा रत्नागिरीतील दिनक्रम वर्णिला आहे.

पुढील प्रकरणांतून शुद्धी चळवळ, पतितपावन मंदिराची उभारणी, स्वदेशी चळवळ, सहभोजने, हिंदू एकता इत्यादींसाठी सावरकरांनी सांप्रत रत्नागिरी–सिंधुदुर्ग जिल्ह्यात जे प्रयास केले, त्याची सोदाहरण चर्चा आहे. त्यासाठी त्यांनी गाव नि गाव पिंजून काढले, मेळावे भरविले, भाषणे दिली आणि प्रत्यक्ष आपल्या कृतींने आपले विचार लोकांच्या मनी उतरविले. या कार्यातील पतितपावन मंदिर हे स्वातंत्र्यवीरांचे चिरंतन स्मारक होय. हे मंदिर बांधण्याचा मूळ उद्देश अस्पृश्यांना मंदिरप्रवेश नाकारणा-या सनातन्यांना विरोध हा होता. याशिवाय अस्पृश्यांसोबत सहभोजन करणे, भंगी माणसांकडून वेदातील ऋचा म्हणवून घेणे, शुद्धी चळवळ दृढतर करणे, हिंदू एकता सक्षम करणे इत्यादींसाठी त्याचा उपयोग व्हावा, ही त्यामागील भूमिका व हेतू होता. त्याला अनुसरून पतितपावन मंदिराचे उद्‌घाटन भागोजीशेट कीर या ब्राह्मणेतराच्या हस्ते वेदोक्त पूजाविधीने झाले. तत्पूर्वी तत्कालीन रूढी - मार्तण्डांनी ते पुराणोक्त मंत्रांनी व्हावे, असा आग्रह धरला होता. सावरकरांनी तो धुडकावून लावला. जगद्‌गुरू शंकराचार्यांनी सावरकरांच्या भूमिकेचे समर्थन केले आणि "कुणाही हिंदुमात्राला वेदोक्त पूजेचा अधिकार आहे", असे निक्षून सांगितले; तथापि रूढी - मार्तंड इरेला पेटले. तेव्हा "तुम्ही कुणी पौरोहित्य करणार नसाल, तर 'हिंदू धर्म की जय' या महामंत्राच्या घोषात मंदिरात मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करू", या शब्दांत त्यांनी सात्त्विक संताप व्यक्त केला. त्या वेळी वेदशास्त्रसंपन्न गणेशशास्त्री मोडक पुढे आले आणि भागोजी कीर यांनी पूजाविधी पार पाडला. या निमित्ताने सावरकरांनी सर्वांना स्मरण करून दिले की, वेदमंत्रापेक्षा 'हिंदू धर्म की जय' हा महामंत्र अधिक अनमोल आहे; कारण शेवटी हिंदू धर्म टिकला, हिंदुस्थान स्वतंत्र झाला, तरच वेदमंत्रांना संरक्षित कवच प्राप्त होईल. अंदमानात पदार्पण करण्यापूर्वीच सावरकरांनी हिंदुस्थानच्या स्वतंत्रता देवतेस उद्देशून लिहिले होते – "मोक्ष मुक्ति ही तुझीच रूपे, तुलाच वेदान्ती योगिजन परब्रह्म म्हणती।"

स्वदेशीच्या प्रचार-प्रसारासाठी ते स्वतः स्वयंसेवकां-सोबत रस्त्यातून स्वदेशी साबण, साखर, कापड, बांगड्या इत्यादी वस्तू हातगाडीवर ठेवून हिंडत असत. दुस-या दिवशी सोने देण्याच्या भावनिक प्रघाताचाही उपयोग त्यांनी अस्पृश्यनिर्मूलनासाठी केला. ते प्रतिष्ठित लोकांच्या घरी आपल्या पूर्वास्पृश्य बांधवांना बरोबर घेऊन सोने द्यायला जात. "जे माझे हिंदू बांधव आहेत, त्यांच्यासह मला घरात घेणार असाल, तर मी आत येतो व सोने देतो; नाही तर मी चाललो", हे त्यांचे उद्‌गार असत. संक्रांतीच्या सणाच्या वेळीही ते हाच प्रयोग करीत. वर्षानुवर्षे उच्चनीचतेच्या प्रथेमुळे ज्या दलित बंधु-भगिनींना कमालीच्या यातना भोगाव्या लागल्या होत्या, त्यांच्याविषयी सावरकरांना अपरंपार आत्मीयता व करुणा वाटत होती. या विषमतेच्या विरोधात त्यांनी प्रभावी मोहीम चालविली ती रत्नागिरीच्या स्थानबद्ध अवस्थेत! त्यांनी तेथील अस्पृश्यतानिवारण, त्यांचा मंदिरप्रवेश, जातिभेद–निर्मूलनाचे आंदोलन इत्यादी समाजसुधारणेचे जे मूलगामी उपक्रम सुरू केले आणि ते समाजात रुजावेत म्हणून अथक श्रम घेतले. तसेच सिंधुबंदी, व्यवसायबंदी, स्पर्शबंदी, वेदोक्त बंदी, शुद्धीबंदी, रोटीबंदी व बेटीबंदी या सात शृंखलांनी जखडला गेलेला समाज त्या बेड्या तोडून मुक्त व्हावा म्हणून सर्वतोपरी प्रयत्न केले आणि या कार्यास संमिश्र हळदी-कुंकू समारंभाने प्रारंभ केला. हे सामाजिक कार्य करीत असताना फुरसत मिळताच सावरकरांनी केलेली ग्रंथनिर्मिती लक्षणीय आहे. तसेच या काळात त्यांना अनेक थोर व्यक्ती भेटल्या. त्याचा वृत्तांतही अनुषंगाने प्रस्तुत पुस्तकात आला आहे.

अखेरच्या उपसंहार प्रकरणात डॉ. कांबळे यांनी स्वातंत्र्यवीरांच्या रत्नागिरी जिल्ह्यातील कार्याचे मूल्यमापन अत्यंत चपखल शब्दांत, काही थोर विचारवंतांची मते उद्धृत करून सावरकरवादाचे विश्लेषण केले आहे. तद्वतच त्यांची अस्पृश्यता निवारणासंबंधीची परखड भूमिका विशद केली आहे. तसेच त्यांच्या बुद्धिप्रामाण्यवादी दृष्टिकोनाची सोदाहरण चर्चा केली आहे. वैज्ञानिक दृष्टीच्या आधारावरच सावरकरांनी 'गोपूजन नव्हे, गोपालन-रक्षण' अशी उपयुक्ततावादी भूमिका स्वीकारली. तसेच त्यांनी आपली प्रज्ञा, प्रतिभा, शक्ती-बळ केवळ समाज-सुधारणेसाठी न वापरता एक प्रकारची सामाजिक क्रांती घडवून आणण्यासाठी सर्वतोपरी प्रयत्न केले आणि एक






वैचारिक नि कृतिशील आंदोलनच रत्नागिरीच्या स्थानबद्धतेत उभे केले. या आंदोलनाविषयी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी म्हणतात, "लोकभ्रम, अंधश्रद्धा, जातिभेद इत्यादी मागासलेपणाची अवलक्षणे नष्ट झाल्याशिवाय हिंदू समाज बलवान होऊ शकणार नाही, हे जाणून सावरकरांनी हिंदू बलसंवर्धनार्थ बुद्धिवादाचे प्रखर अस्त्र रूढी व परंपरेवर चालविले. पश्चिमी विज्ञान व तंत्र यांच्या योगाने पाश्चिमात्य राष्ट्रे सामर्थ्यशाली बनून अत्यंत वेगाने प्रगतीचा मार्ग आक्रमीत आहेत, हे पाहून त्यांनी पोथीनिष्ठेवर आघात करून विज्ञाननिष्ठेचा पुरस्कार केला आणि उपयुक्ततावादी नीतिशास्त्र अंगीकारले, लोकक्षोभाची पर्वा न करता गोभक्षणाचेही समर्थन केले. त्यांनी राष्ट्रबलसंवर्धनार्थ विज्ञानाची, यंत्राची आराधना करण्याचा संदेश दिला."

अनेक लेख लिहून, व्याख्याने देऊन सावरकरांनी वैज्ञानिक दृष्टीच्या प्रसार-प्रचाराची एक आघाडीच उघडली; कारण लोकप्रियतेपेक्षा लोकहिताचा विचार महत्त्वाचा मानून धर्मभोळेपणा, भाबड्या समजुती, भ्रामक रूढी, भोळसट श्रद्धा, बावळट विचार, घातक अंधश्रद्धा, परंपरा यांवर त्यांनी आसूड उगारला, हे डॉ. रमेश कांबळे यांनी सावरकरांच्या विचारसरणीचे केलेले मूल्यमापन त्यांच्या वैचारिक भूमिकेस न्याय देणारे आहे.

पुस्तकाचे नाव : स्वातंत्र्यवीर
सावरकरांचे रत्नागिरीतील
सामाजिक कार्य
लेखक : डॉ. आर्. एच्. कांबळे
प्रकाशक व प्रकाशन काळ :
डायमण्ड पब्लिकेशन्स, पुणे.
फेब्रुवारी २०१६.
किंमत - रु. १२५/-

***

◈ **श्री. के. वनपाल**

श्री. वनपाल यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची परीक्षा देऊन मामलेदार म्हणून नोकरीस सुरुवात केली व पदोन्नती मिळवत ते महसूल खात्याच्या सचिव पदावरून निवृत्त झाले. शेती, शेतकरी व त्यांचे अर्थकारण याची त्यांना तृणमूल स्तरावरून माहिती आहे.

**पत्ता** :- अ-८, रे-व्हेन्यू को. ऑ. हाऊसिंग सोसायटी, गणेशखिंड रस्ता, आय्-सी-एस् कॉलनी. पुणे ४११ ००७.
दूरध्वनी - ०२०-२५५३२१४३, भ्रमणध्वनी : ९९२२५०१४६४.

◈ **प्राचार्य डॉ. पंडितराव शा. पवार**

मराठीचे निवृत्त प्राध्यापक. एम. ए., पीएच. डी. (मराठी); नाशिक जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाज, नाशिक या संस्थेत ३० वर्षे प्राचार्य. पुणे विद्यापीठाचा उत्कृष्ट प्राचार्य म्हणून पुरस्कार. साहित्य व शिक्षण यांवर लेखन. गेली चाळीस वर्षे उच्चशिक्षण क्षेत्रात कार्यरत.

***पत्ता :–*** ६, ऋषिराज पार्क, अरिहंत नर्सिंग होमजवळ, गंगापूर रोड, नाशिक – ४२२०१३.
दूरध्वनी :– (०२५३) २३४३७८७. भ्रमणध्वनी : ९४२३१८१०८७.

◈ **डॉ. राजेंद्र गणेश डोळके**

प्रथितयश समीक्षक व विदर्भ साहित्य संघाचे माजी पदाधिकारी.

***पत्ता :–*** उषःकाल ३, फ्लॅट नं १०१, प्लॉट नं. १९,२० परफेक्ट को. ऑ. हौ. सोसा. इंद्रप्रस्त नगर, मोखाडे कॉलेज समोर, नागपूर. ४४००२२.
भ्रमणध्वनी : ९४२२१४६२१४.

◈ **डॉ. सु. र. देशपांडे**

मराठी विश्वकोशात पुरातत्त्वविद्या, मानवशास्त्र, राज्यशास्त्र या विषयांचे संपादक, भारतीय शिल्पकला विषयांचे लेखक. वाई : कला आणि संस्कृती या ग्रंथाचे लेखक.

***पत्ता :–*** विश्वकोश कॉलनी, पांचगणी रस्ता, वाई, जि. सातारा.

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६८ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ४००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

'नवभारत'मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता'कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत'च्या संपादकांना द्यावी.

४. 'नवभारत'मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत'मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ

अनुक्रमणिका

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




